# शुक्राचें चांदणें

[ कलाहीन कथांचा संग्रह ]

गजानन त्र्यंबक माडखोलकर

जानेवारी, १९३८

मूल्य सव्वा रुपया

# अनुक्रम

श्री. माधवराव दातार
श्री. ए. श्री. पटवर्धन
शेठ खुशालचंदजी
यांना स्नेहपूर्वक
समर्पण

# माडखोलकरांचीं पुस्तकें

## प्रबंध

(१) आधुनिक कविपंचक

(२) विष्णु कृष्ण चिपळूणकर

(३) विलापिका

(३) वाङ्मयविलास

## कादंबरी

(१) मुक्तात्मा

(२) भंगलेलें देऊळ

(३) शाप

(४) कांता

## कथासंग्रह

(१) शुक्राचें चांदणें

(२) रातराणींचीं फुलें

# शुक्राचें चांदणें

कोठडीच्या दाराशीं घोंगडी टाकून मी नुकताच आडवा झालों होतों. अद्याप रात्र फारशी झाली नव्हती. पण सूर्य मावळल्याबरोबरच माझ्या कोठडींत मध्यरात्रीचा काळोख पसरत असे. वरतीं आकाशांत नक्षत्रें कितीहि फुललेलीं असलीं किंवा खालीं जमिनीवर चांदणें कितीहि पडलेलें असलें, तरी गुन्हाखान्यां-तील त्या एकांत कोठड्यांतून सायंकाळीं कोंडल्या जाणाऱ्या कैद्यांना त्यांचा तो प्रकाश काय होय ? तरीसुद्धां मी प्रयत्न करित असे.—माझ्या कोठडीच्या लोखंडी दाराजवळ कांबळें टाकून पडलें, म्हणजे सरासरी दोन अडीच हात आभाळाचा पट्टा दृष्टीस पडे. तें आकाश पहाण्याचा, त्या दोन अडीच हातांच्या क्षितिजावर उदयास्त पावणाऱ्या तारकांचें दर्शन घेण्याचा माझा नेम कधीं चुकला नाहीं. नाहीं तरी मानवी मनाचें क्षितिज असें काय मोठें विशाल असतें, कीं ज्यावर अगणित दिव्य कल्पनांचीं नक्षत्रें उमललेलीं दिसावीं ? त्या धूसर क्षितिजापेक्षां तुरुंगाच्या लोखंडी गजांतून दिसणारें हें क्षितिज किती तरी प्रसन्न, किती तरी आल्हाददायक वाटे !

कोठडीच्या दाराजवळ निजणें हा तुरुंगाच्या शिस्तीच्या दृष्टीनें वास्तविक गुन्हा होता; व पहिल्या रात्रीं उमेदसिंग जेव्हां पहाऱ्याला आला, तेव्हां त्यानें मला त्याबद्दल समजहि दिली. पण, आंत चौथऱ्यावर निजल्यानें उकाडा होऊन जीव गलबलतो, असें सांगून मीं त्याची समजूत घातली. आणि रोज कोठडीच्या दाराशीं निजण्याचा हक्क त्याच्या सहृदयतेमुळें मला अखेर मिळाला.

मी त्या घोंगडीवर पडून उत्कंठेनें वाट पहात होतों. काल किती तरी दिवसांनीं त्या लोखंडी गजांतून दिसणाऱ्या आकाशाच्या निरुंद पट्ट्यावर शुक्राचा तारा माझ्या दृष्टीस पडला होता;—त्याचें सौम्य चांदणें कांहीं क्षण माझ्या अंधाऱ्या कोठडींत पडून त्यानें माझें मन उजळलें होतें. आजहि पुन्हा शुक्र आपल्या दृष्टीस

पडेल, त्याच्या त्या उज्ज्वल प्रभेचें अंधुक चांदणें आपल्या खोलींत येईल या आशेनें मी क्षितिजाकडे टक लावून कांबळ्यावर पडलों होतों. उत्कंठेनें माझें भान जणुं नाहींसें झालें होतें. गुन्हाखान्यांतील शेवटच्या कोठडींतील कैदी एकांताच्या भीतीनें विव्हळत होता;—पण मला ऐकूं येत नव्हतें त्याचें तें आक्रंदन ! मी वाट पहात होतों,— त्या गजांतून दिसणाऱ्या आकाशाच्या पट्यावर शुक्र केव्हां येईल आणि त्याचें चांदणें माझ्या अंगावर केव्हां पडेल याची !

तोंच माझ्या ताठरलेल्या डोळ्यांवर प्रकाशाची तिरीप पडली.

अवचित डोळ्यांवर पडलेल्या त्या प्रकाशामुळें माझी दृष्टि दिपल्यासारखी झाली; व त्या प्रकाशाआडून माझ्याकडे कोण पहात आहे, हें माझ्या चटकन् लक्षांत आलें नाहीं. तोंच माझ्या कानांवर अस्सल ऊर्दू जबानमध्यें उच्चारलेले शब्द आले, " काय, इतक्या लवकर झोंप लागली आज तुम्हांला बाबूजी ?"

ते शब्द कानांवर पडतांच मी धडपडतच उठलों व हिंदींत म्हणालों, " नाहीं सरदारजी !—इतक्या लवकर झोंप कोठून येणार ?"

" मग कांहीं चिठ्ठी वगैरे आली आहे का घरून ? मी आलों त्या वेळीं बेहोष होतात तुम्ही अगदीं !"

" होय, होतों खराच. पण त्याचें कारण चिठ्ठी मात्र नव्हे. घरून चिठ्ठी यायला अद्याप पुरता एक महिना आहे. तेव्हां त्याचा विचार करून तरी काय उपयोग ? तरीसुद्धां मी बेभान होऊन पडलों होतों खरा. नाहीं तर तुमची ही रोजची येण्याची वेळ !—मला सावध करावं लागलं नसतं तुम्हांला अशा रीतीनं !—"

" कसला उन्माद आला होता तुम्हांला आज एवढा ? माणसाला असा उन्माद यायला त्याच्या हातून कांहीं तरी अचाट कृत्य घडलेलं असावं लागतं. म्हणजे त्याच्या नुसत्या आठवणीनंसुद्धां तो उन्मत्त होतो—"

बोलतां बोलतां उमेदसिंगाच्या डोळ्यांत उन्मादाची विलक्षण लकेर आली.

तुरुंगाच्या जगांत पाऊल ठेवल्यापासून गेल्या चार महिन्यांत मी अनेक चमत्कारिक, अनेक अघोर दृश्यें पाहिलीं होतीं. पण उमेदसिंगाइतकें मनाला गोंधळून सोडणारें—आश्चर्य, आदर आणि अनुकंपा यांचें काहूर मनांत निर्माण

करणारें दुसरें दृश्य मी पाहिलें नव्हतें. सुपरिंटेंडंटसाहेबांच्या मागून अदबीनें चालणारी त्याची ती धिप्पाड, ताठर, गोरीपान मूर्ति मी प्रथम जेव्हां पाहिली, तेव्हां मला शंकाहि आली नाहीं कीं, हा खुनाच्या आरोपावरून तुरुंगांत आला असेल म्हणून ! त्याच्या हाताखालचे सारे वॉर्डर कैदी त्याला ‘ सरदारजी ’ म्हणत असत; व सुपरिंटेंडंटसाहेबांच्या आवाजांतसुद्धां त्याचें ‘ उमेदसिंग ’ हें नांव उच्चारतांना एक प्रकारचें मार्दव उत्पन्न होत असे. त्याचें तें साऱ्या बाजूंनीं केसांनीं वेष्टिलेलें भव्य कपाळ, हंसल्याबरोबर मनाचा निर्व्याजपणा व्यक्त करणारी शुभ्र दंतपंक्ति आणि जगाकडे निर्भयतेनें पहाणारे ते काळेभोर, विशाल डोळे !–कुणाला शंका तरी आली असती का, कीं खुनाबद्दल जन्मठेपीची शिक्षा होऊन तो तुरुंगांत आला आहे म्हणून ? पण दुसऱ्याच दिवशीं ती गोष्ट मला कळली;—नव्हे, त्यानें स्वतःच सांगितली.

तेव्हांपासून माझें मन अगदीं बेचैन झालें. सरदार उमेदसिंग आणि खून,—तोहि स्त्रीचा खून ! शक्य कसें आहे हें ? मी त्याच्याकडे पुनः पुन्हा जिज्ञासेनें पहात असे.—त्याच्या त्या निर्भय नेत्रांत, त्या प्रसन्न हास्यांत, त्या रुबाबदार गतींत, त्या भव्य भालप्रदेशावर कुठें कुठें देखील गुन्हेगारीच्या जाणिवेची ओझरती सुद्धां शरम व्यक्त होत नसे. नाहीं म्हणावयाला, रात्रीं तो पहाऱ्यावर आला, म्हणजे त्याचे डोळे उन्माद चढल्यासारखे केव्हां केव्हां दिसत; तो अगदीं झोंपेंत चालत बोलत असल्यासारखा वागे; व केव्हां केहां तर अश्रुहि त्याच्या डोळयां-तून पडत.

पण, मला वाटे, हें सारें घरच्या आठवणीनें तर होत नसेल ? म्हणून मी एकदां त्याला विचारलें, “ सरदारजी, तुरुंगांत अडकून पडलेल्या माणसाला घरची आठवण फार दुःख देते नाहीं ?”

त्यावर तो अगदीं मनःपूर्वक हंसून मला म्हणाला, “ होय बाबूजी, घरचीं माणसं ज्याला असतील त्याला त्या दुःखाची कल्पना !—”

अर्थात् माझा तो समज चुकीचा ठरला; व त्यामुळें त्याला केव्हां केव्हां पछाडणाऱ्या त्या उदासीनतेचें, त्या गूढ शोकावेगाचें मला राहून राहून आश्चर्य

वाटूं लागलें. ज्या खुनाच्या आरोपावरून तो जन्मठेपेची शिक्षा होऊन तुरुंगांत आला होता, त्याचा तर संबंध त्याच्या या उदासीनतेशीं नसेल ना ? पण तसें त्याला स्पष्ट विचारावयाचें कसें ? तो पहाऱ्यावर आल्यानंतर माझ्याशीं त्याच्या तास अर्धा तास गप्पागोष्टी झाल्या नाहींत, असें सहसा घडत नसे. पण इतका त्याचा माझा लोभ असूनसुद्धां मनांत सतत घोळणारी ही शंका त्याला कधीं बोलून दाखविण्याचा धीर मला झाला नाहीं.

परंतु--

" माणसाला असा उन्माद यायला त्याच्या हातून कांहीं तरी अचाट कृत्य घडलेलं असावं लागतं. म्हणजे त्याच्या नुसत्या आठवणीनंसुद्धां तो उन्मत्त होतो--"

हें त्याच्या तोंडचें वाक्य मी आज ऐकलें आणि एकदम माझें भान गेल्यासारखें होऊन मी त्याला विचारलें, " काय सरदारजी, तुमच्या आयुष्यांत असं एखादं अचाट कृत्य तुमच्या हातून घडलं आहे कां कीं ज्याच्या आठवणीनं तुम्ही बेहोष व्हावं ? "

मी तो प्रश्न विचारला. पण नंतर माझी मलाच भीति वाटली, शरम वाटली.

माझा तो प्रश्न ऐकतांच उमेदसिंग वरमल्यासारखा झाला; व हातांतील कंदील खालीं ठेवून ओट्यावर बसला. कांहीं क्षण तो अगदीं स्तब्ध होता. त्याच्या डोळ्यांतील उन्मादाची लकाकी आतां अधिकच वाढली होती.—मी किंचित् भीतीनें त्याच्या हालचालींकडे पहात होतों.—त्याचे ओठ थरथरत होते; कपाळावर घर्मबिंदूंची ओळ तरारून उठली होती; व आपल्या त्या मांसल आरक्त हातांना सुटलेला कंप दाबून टाकण्याकरितांच कीं काय, त्यानें दोन्ही तळवे एकांत एक घट्ट गुंतवले होते.

त्याच्या त्या निःशब्द पण क्षोभसूचक हालचाली पाहून माझा जीव गुदमरल्यासारखा झाला.

इतक्यांत तो मला एकदम आवेशानें म्हणाला, " खरा आहे बाबूजी

तुमचा प्रश्न. मी तुरुंगांत आल्याला सहा वर्षं झालीं असतील आतां. पण आजपर्यंत कुणीहि हा प्रश्न विचारला नव्हता मला--"

" मग असं कोणतं कृत्य घडलं तुमच्या हातून ?—तुमच्याकडे बघितल्या क्षणापासून मला असं वाटे कीं, तुमच्या हातून खून घडणं शक्य नाहीं. तुमच्या त्या अचाट कृत्याचा न् तुरुंगांत येण्याचा संबंध आहे का कांहीं ? "

" होय. त्या कृत्यानंच मला तुरुंगांत आणलं. अचाट, अघोर काय वाटेल तें नांव द्या तुम्ही त्या कृत्याला. त्या कृत्यामुळं माझी स्थिति पिशाचानं झपाटलेल्या माणसासारखी झाली आहे. इतर वॉर्डरांना रात्रपाळीचं मोठं संकट वाटतं. पण मी मात्र रात्रपाळी मुद्दाम हौसेनं मागून घेतों. कारण स्वतःच्या कोठडींत अंथरुणावर तळमळत पडून त्या कृत्याचा भीषण चित्रपट पहात रात्र घालवण्यापेक्षां मला रात्रभर जागत पहारा करणं जास्त परवडतं--"

" इतकं अघोर कृत्य तुमच्या हातून घडलं ? "

" होय. सांगतोंच मी तुम्हांला आतां ती सारी हकीकत. मी मूळचा या प्रांतांतला नाहीं. अमृतसरजवळ एका खेड्यांत माझा जन्म झाला. माझे आईबाप बाळपणींच वारल्यामुळें मी वयाच्या दहाव्या वर्षांपासूनच कचेऱ्यांतून छोकऱ्याचें काम करूं लागलों. लाहोरला एक बडी युरोपियन कंपनी आहे. तिचा दुय्यम मॅनेजर अमृतसरला दौऱ्यावर आला असतां मी सहज त्याच्या नजरेला पडलों. तेव्हां त्यानें आमच्या ऑफिसच्या मॅनेजरपासून मला मागून घेतलें; व मी जरी त्याचा चपराशी म्हणून 'त्याच्याबरोबर रहात असें, तरी पोटच्या पोराप्रमाणें तो माझी काळजी घेत असे--"

बोलतां बोलतां त्याचा आवाज घोगरा झाला. तेव्हां मी त्याला विसांवा देण्यासाठीं म्हटलें, " हा तुमचा साहेब मोठा खानदान असला पाहिजे मग ? "

उमेदसिंग खांकरून घसा साफ करून म्हणाला, " नाहीं.—मला केव्हां केव्हां वाटतें, पुढें जो भयंकर प्रकार घडला, तो माझे साहेब खानदान नसल्यामुळेंच घडला असावा. ते अस्सल युरोपियनासारखे गोरे भुरे होते; त्यांचे डोळे

निळसर हिरवे होते; व रुबाब तर विलायतेहून नवीन आलेल्या साहेबाला लाजविणारा होता. पण लाहोरच्या कोणत्याहि बड्या युरोपियन क्लबांत ते जात नसत. पुढें माझ्या कानांवर असें आलें कीं, त्यांची आई काश्मिरी असल्यामुळें ते कमअस्सल मानले जाऊन युरोपियन समाजांत त्यांना बरोबरीच्या नात्यानें वागविलें जात नसे. या अपमानाचें शल्य त्यांच्या हृदयांत खोलवर घुसून त्यानें त्यांचें जीवित दुःखमय करून टाकलें. त्यांना फार मोठा पगार होता. त्यांनीं बंगलाहि आपल्या दर्जाला शोभेसारखा घेतला होता; व ते पाण्यासारखा पैसा आपल्या एकट्याच्या जिवासाठीं खर्च करीत असत. पण त्यांचें मन सुखी नव्हतें, त्यांच्या जीवितांत कोणत्याहि प्रकारचा आनंद नव्हता--

त्यांच्या त्या उत्कृष्ट रीतीनें शृंगारलेल्या बंगल्यांत ते आणि आम्ही त्यांचे नोकर एवढींच माणसें होतों. त्यांनीं कधीं युरोपियन समाजांतील स्त्रीपुरुषांना आपल्या घरीं बोलाविलें नाहीं किंवा कुणाला कधीं खाने दिले नाहींत. लाहोरा-सारख्या राजधानीच्या शहरांत वैभवामध्यें राहूनहि ते विजनांत असल्यासारखें भयाण, एकांत आयुष्य कंठीत होते. संध्याकाळीं कचेरींतून सुटल्यावर ते खेळाव-याला जात; व तेथून परत आले, म्हणजे जेवल्यावर आपल्या खाजगी खोलींत येऊन बसत. मग शराब आणि ते!--मी पेले भरून देत त्यांच्यासमोर उभें रहायचें आणि त्यांनीं अर्धवट स्वतःशीं न् अर्धवट माझ्याशीं बोलत मनसोक्त शराब प्यायची, असा आमचा कार्यक्रम होता. घरीं, कचेरींत, दौऱ्यांत मी सांवलीसारखा त्यांच्या सान्निध्यांत असें. त्यांच्या संवयी, गरजा, विकार वगैरेंशीं मी इतका समरस झालों होतों कीं, त्यांच्या तोंडून कोणतीहि इच्छा व्यक्त होण्यापूर्वीच तिच्या पूर्ततेची व्यवस्था मी करित असे! इतरांना अगम्य असलेल्या, लाहोरांतील युरोपियन समाजाच्या कुतूहलाचा विषय होऊन बसलेल्या त्यांच्या आंतर जीवनाचा मी जणुं कांहीं साक्षिदार होतों,--त्यांना आणि मलाहि न कळत मी त्या जीवनाचा वांटेकरी झालों होतों.

अशा रीतीनें लाहोरला आम्ही सात वर्षे काढलीं. त्यानंतर साहेबांना त्या बैठ्या, ठरीव जीवनक्रमाचा कंटाळा आला; व आमच्या कंपनीची शाखा काढण्यासाठीं

म्हणून ते या प्रांतांत जबलपूरला रहावयाला आले. तेथें आल्यानंतर लवकरच त्यांच्या आयुष्यांत एक अत्यंत महत्त्वाचा फरक झाला,—आजपर्यंत शराबानें व्यापलेल्या त्यांच्या जीवनांत आतां स्त्रीनें प्रवेश केला. रोज रात्रीं क्लबांतून खेळून परत येतांना, ते कोणा तरी नवीन स्त्रीला घेऊन यावयाचे, व नंतर तिच्या सहवासांत त्यांचा खाना वगैरे व्हावयाचा. मध्यरात्रीं आणि केव्हां केव्हां तर पहांटेसुद्धां त्या स्त्रीला परत पोंचविण्याचें काम मला करावें लागत असे. त्यांच्या आयुष्यांत झालेला हा फरक मला कसासाच वाटला;—विशेषतः मला अपरात्रीं उठवून त्या स्त्रीला पोंचविण्याचें काम साहेबांनीं सांगितलें, म्हणजे माझें मन अतिशय अस्वस्थ होत असे. खुद्द त्यांच्याहि लक्षांत ही गोष्ट आली असावी. एक दिवस पहांटेच्या सुमारास एका स्त्रीला पोंचवून मी परत आलों असतां, साहेब व्हरांड्यांत येरझारा घालीत होते. मी आलेला दृष्टीस पडतांच त्यांनीं मला हांक मारून जवळ बोलाविलें; व माझ्या खांद्यावर हात ठेऊन ते म्हणाले, "बेटा उमेद, तूं अजून बच्चा आहेस! मनाच्या वेदना विसरण्यासाठीं कोणत्या गोष्टी कराव्या लागतात याची कल्पना नाहीं तुला अजून!" जबलपुराला आल्यावरहि युरोपियन समाजाचा त्यांच्यावरील बहिष्कार कायमच होता;—मात्र रात्रीच्या वेळीं किती तरी गौरांगना गुप्त रीतीनें त्यांच्या बाहुपाशांत खिदळतांना मी पाहिल्या होत्या;—खरोखरी बाबूजी, जाति-भेदाच्या बाबतींत युरोपियनांइतके सांप्रदायिक लोक जगांत दुसरे कोणी नसतील. त्यांच्या त्या निष्ठुर, सांप्रदायिक नीतीनें साहेबांचा बळी घेतला, त्यांच्या आयुष्याचें मोतेरें केलें!

त्यांच्या बेछूट जीवनक्रमाला लवकरच आणखी एक फांटा फुटला. कंपनीचे चालक या नात्यानें त्यांना मधून मधून प्रांतभर दौरा काढावा लागत असे. या दौऱ्यांत आलेला विलासी जीवनाचा अनुभव अधिक वैचित्र्यपूर्ण वाटल्यामुळें म्हणा किंवा जबलपूरसारख्या ठिकाणीं लोकांची आपल्यावर केंद्रित होणारी दृष्टि टाळण्यासाठीं म्हणून म्हणा, शनिवार आणि रविवार हे आठवड्यांतले दोन दिवस त्यांनीं जबलपुरापासून दूर कुठल्या तरी डाकबंगल्यांत घालवावयाला सुरवात केली. डाकबंगल्याची निवड करितांना लोकांची नजर चुकविण्याची बुद्धि आणि निसर्गरम्य

अशा निवांत जागेची आवड या दोन्ही गोष्टी प्रभावी होत असत. शनिवारीं दुपारीं ऑफिस सुटल्याबरोबर शिकारीच्या तयारीनें मोटार घेऊन बाहेर पडावयाचें व दोन रात्रीं कुठल्या तरी डाकबंगल्यांत मजेनें घालवून सोमवारीं सकाळीं पुन्हा ऑफिसांत हजर व्हावयाचें, असा त्यांचा क्रम सुरू झाला. या प्रवासी मुक्कामाची सारी व्यवस्था अर्थात् मलाच ठेवावी लागे; व त्या वेळीं होणाऱ्या हरिणाक्षींच्या शिकारी पाहून साहेबांच्या भवितव्याविषयीं माझ्या मनाला काळजी वाटूं लागली. पण त्यांच्यासमोर उभें राहून त्यांना कांहीं सांगण्याची माझी ताप नव्हती. शिवाय, मला वाटे, कोणाला ठाऊक त्यांचें आंतर जीवन काय आहे तें;—कोणत्या मनोव्यथांचा विसर पडण्यासाठीं त्यांनीं या विकृत विलासी जीवनाचा आसरा घेतला आहे तें !

आणि, या प्रवासी जीवनांत त्यांच्या मनोभावनांच्या ज्या ओझरत्या छटा केव्हां केव्हां माझ्या दृष्टीस पडत, त्यामुळें माझें मन त्यांच्याविषयीं अधिकच सानुकंप होत गेलें. पुष्कळदां असें होई कीं, त्यांच्या मनासारखी शिकार न मिळाल्यामुळें माझ्याच सहवासांत त्यांना रात्रीं घालवाव्या लागत. अशा भोगशून्य, एकांत रात्रीं शराबाच्या प्रत्येक पेल्याबरोबर होणारें त्यांचें स्वगत भाषण म्हणजे त्यांच्या आंतर जीवनाचें एक एक पानच असे. बाहेर भयाण रात्र पसरलेली, रातकिड्यांच्या किर्र आवाजानेंच तिच्या निःस्तब्ध भयाणतेचा काय भंग होईल तेवढाच आणि शराबाचे घुटके घेत साहेब अस्खलित बोलत असलेले !—अशा किती तरी रोमांचकारी रात्री मी घालविल्या आहेत त्यांच्या सान्निध्यांत. त्यांनीं कितीहि शराब घेतली तरी त्यांना नशा येत नसे;—जणूं कांहीं त्यांच्या रक्तांतच शराब भिनून गेली होती. आणि ते बोलत तेहि पूर्ण जाणिवेनें. वस्तुतः मी त्यांचा कोण होतों ? ते बोलतील तें ऐकावयाचें आणि सांगतील तें करावयाचें, एवढीच माझी त्यांच्या जीवनांतील भूमिका होती. पण, असल्या एकांताच्या वेळीं—कोणाला ठाऊक कां तें ! —ते जणूं आपलें हृदय खोलून त्याचा कप्पा न् कप्पा मला दाखवीत. बाहेर बर्फाचें भयंकर वादळ घोंघावत असावें न् खिडकीच्या तावदानांतून तें पहाणाऱ्या माणसाच्या मनाची जशी भयचकित स्थिति व्हावी, तशी त्यांचें तें हृदयाविष्करण

पाहून होत असे माझ्या मनाची अवस्था. " बेटा उमेद ! " हे शब्द त्यांच्या तोंडांतून बाहेर पडले, म्हणजे माझ्या अंगावर रोमांच उभे रहात असत. कारण अत्यंत प्रेमानें, अत्यंत विश्वासानें, सहानुभूतीच्या आत्यंतिक अपेक्षेनें उच्चारलेले ते शब्द म्हणजे त्यांच्या गुदमरलेल्या हृदयाची आर्त हांक असे !--

आणि, खरोखरीच त्यांचें हृदय गुदमरलेलें होतें, त्यांच्या मानी मनाचा कोंडमारा झालेला होता. आपल्या जन्माचें रहस्य त्यांनीं कधींच मला सांगितलें नाहीं; निमगोऱ्यांच्या कोणत्या अनाथालयांत आपण वाढलों हें केव्हांहि त्यांनीं बोलून दाखविलें नाहीं; किंवा एकांतांत त्यांची शृंगारशय्या हैसेनें साजरी करणाऱ्या कोणत्या हिमगौर कुलकन्येनें त्यांची विवाहाची मागणी लाथाडून त्यांच्या कुलहीनतेवर वर्मी डाग दिला, याचीहि वाच्यता त्यांनीं कधीं केली नाहीं. पण " बेटा उमेद ! " हे शब्द त्यांनीं उच्चारले, म्हणजे अत्यंत प्रभावशाली अशी एक व्यक्ति उरीं फुटून आपल्याशीं आक्रंदून बोलत आहे, असें मला वाटे. एकाद्या हताश माणसानें आपल्या हातानें आपली रक्तवाहिनी कापावी व तिच्यांतून बाहेर पडलेल्या रक्ताच्या लोटांत नाहून निघावें, तसें त्यांचें स्वगत भाषण असे तें. मी त्या भाषणाला स्वगत एवढ्याचसाठीं म्हणतों कीं, माझ्यापासून कोणत्याहि प्रकारच्या उत्तराची, सहानुभूतीच्या शब्दाची अपेक्षा त्यांना नसे. किंबहुना, मी तसा एक शब्द जरी उच्चारला असता, तरी त्यांना तें सहन झालें नसतें. आपल्यावर अत्यंत प्रेम करणारी व्यक्ति सतत आपल्याजवळ असावी, जमिनींतून वहाणाऱ्या झिरप्याच्या ओलाव्याप्रमाणें तिच्या अव्यक्त सहानुभूतीनें आपलें जीवित टवटवीत करावें, पण तिनें ती सहानुभूति शब्दांनीं व्यक्त केलेली मात्र सहन होऊं नये, अशी त्यांची विलक्षण मानी मनोरचना होती. " बेटा उमेद, माझ्या जीवनाला शोष, आंतून शोष लागला आहे सारखा !-- कितीहि शराब मी प्यालों तरी ही प्यास कमी व्हायची नाहीं !—"असा आरंभ असावयाचा त्या स्वगत भाषणाचा; आणि " बच्चा, तुझा मालिक पागल आहे असं वाटत असेल नाहीं रे तुला ? " या वाक्यानें शेवट व्हावयाचा त्या भाषणाचा ! "

बोलतां बोलतां पुन्हा उमेदसिंग थांबला. त्याचा आवाज घोगरा झाला

होता, त्याचे डोळे भरून आले होते व एकांत एक घट्ट दाबून धरलेले त्याचे हात आवेगानें हलत होते. मला वाटलें; त्याच्या डोळ्यांपुढून कसलें तरी अत्यंत करुणभीषण दृश्य जात आहे.

तोंच त्यानें आवंढा गिळून पुन्हा बोलावयाला सुरवात केली—

" त्या रात्रीं घडलेला तो भयंकर प्रकार अजूनहि माझ्या डोळ्यांपुढून हलत नाहीं. सात वर्षें झालीं त्या प्रसंगाला आतां;—पण त्या रात्रीं झालेल्या त्या अघोर कृत्याचा प्रत्येक क्षण न् क्षण जणु काल घडल्याप्रमाणें सारखा डोळ्यांपुढें दिसत असतो माझ्या. उन्हाळा सुरू झाल्यामुळें आम्हीं पंचमढीला रहावयाला गेलों होतों. शनिवारीं सायंकाळीं साहेब नित्याप्रमाणें शिकारीसाठीं म्हणून बाहेर पडले; व सातच्या सुमारास आम्ही वाटेंतील एका घांटावरल्या डाकबंगल्यांत येऊन पोंचलों. हा बंगला साहेबांचा फार आवडता होता. डोंगरकड्याच्या एका बाजूनें बेलाग असलेल्या पठारावर तो बांधलेला असून, त्याच्यासमोर अतिशय खोल दरी व सभोंवती गर्द रान होतें. तो पठार इतका निवांत आणि निर्मनुष्य होता कीं, वनराजाची स्वारी रात्रींच्या वेळीं पुष्कळदां त्या बंगल्याच्या आसपास फिरकत असे, म्हणतात. संध्याकाळच्या वेळीं बंगल्याच्या व्हरांड्यांत खुर्ची टाकून बसलें, म्हणजे त्या गर्द रानाच्या आसऱ्यानें पसरलेला काळोख आपल्याला चारी बाजूंनीं गिळीत आहे असें वाटावयाचें !—वाऱ्याचा सतत चालणारा हैदोस हा जणूं त्या काळोखाचा श्वास, झाडांचे निष्पर्ण सोट हें जणूं त्याच्या अंगावरील ताठर केंस आणि अंधारांत चमकणारीं नक्षत्रें हे जणुं कांहीं त्याच्या फणेवरील शुभ्र ठिपके—असें त्या काळोखाचें सारेंच दृश्य मोठें भयानक असे. बंगल्यांत तैनातीला असलेले खानसामा वगैरे नोकरसुद्धां रात्रीं नवानंतर तिथून खालीं मैल दीड लांब असलेल्या गांवांत निजावयाला जात.

पण, त्या बंगल्याच्या पटांगणांत पलंग टाकून निजणें, हा साहेबांचा एक आवडता शौक होता. त्यांच्या काश्मीरी रक्ताला उन्हाळ्याची तलखली अगदीं सहन होत नसे; व गुलाबाच्या नुकत्याच उमललेल्या फुलांसारखी असलेली त्यांची अंगकांति कोळपून जाऊन त्यांचें अंग उन्हाळ्याच्या दिवसांत पोळल्यासारखें

दिसावयाचें. एप्रिलपासून जुलैपर्यंतचे त्यांचे दिवस एक प्रकारच्या उन्मादामध्यें जात असत. उन्हाळ्यांत शराब न घेतल्यास त्यांची प्रकृति शांत राहील, असें मी त्यांना एकदां सहज सुचविलें. तेव्हां ते हंसून मला म्हणाले, " उमेद ! तूं बच्चा आहेस अजून ! अरे, या हृदयांत जो डोंब पेटलेला आहे, त्यापेक्षां शराबाची आग अधिक नाहीं—उन्हाळ्याची झळ जास्त नाहीं ! " शराबाच्या अतिरिक्त सेवनामुळें ते उन्हाळयाच्या दिवसांत मात्र नशा चढून बेफाम झाल्यासारखे केव्हां केव्हां वागत असत.

त्या दिवशींची ती काळरात्र अशीच बेफामीची होती.

रात्रीं खाना झाल्यावर साहेबांनीं खानसाम्याला विचारलें, " पुढला इंतजाम नीट केला आहेस ना ? "

त्याबरोबर तो अदबीनें म्हणाला, " मी पुष्कळ प्रयत्न केला आपल्याकडून. पण आज आपल्या मनासारखा इंतजाम होऊं शकला नाहीं हुजूर !—"

त्याच्या तोंडून ते शब्द बाहेर पडतांच साहेबांनीं टेबलावर ठेवलेला हंटर उचलला; व तो खानसाम्याच्या पाठीवर उडवला.

त्या आवाजाबरोबर मी धांवतच आंत आलों—

मी पाहिलें, आजचा नूर कांहीं न्याराच होता—

खानसामा जमिनीवर पडून अजीजीनें बोलत होता,—साहेब रागानें बेभान झाले होते.

मला आंत आलेला पाहतांच ते किंचित् नरमाईनें म्हणाले, " उमेद, हा बेवकूब इंतजाम होऊं शकत नाहीं म्हणून आतां सांगतोय मला !—मला तर आज एकट्यानं रहाणं शक्य नाहीं. या मनीबॅगमधले वाटेल तितके पैसे खर्च कर तूं !—पण कांहीं झालं तरी एकटा परत येऊं नकोस मला तोंड दाखवायला—"

साहेब माझ्याशीं बोलत असतांनाच खानसामा पसार झाला होता. मी मुकाट्यानें मनीबॅग उचलली; व गॅरेजमधून गाडी बाहेर काढून गांवाकडे यावयाला निघालों.

बाहेर अंधार मी म्हणत होता. वळवाच्या पावसाची थांबती सर नुकतीच पडून गेल्यामुळें जिवाला गुदमरून टाकणारी हवेंतील गरमी अधिकच वाढली होती; व रानांतील ओल्या झालेल्या पाचोळ्याचा रानवट वास हवेंत पसरला होता. क्षितिजाच्या एका कोपऱ्यांत वीज मधून मधून लकाकत होती. तिच्या प्रकाशांत पर्णहीन झाडांच्या आणि वेडयावांकडया ढगांच्या आकृति मोठ्या भयानक दिसत होत्या. उतरणीवरून गाडी घेऊन गांवांकडे येत असतां मला क्षणोक्षणीं वाटे, रस्त्यांत वनराजानें अडविलें तर? पण मी तसाच बेदरकारपणानें मोटार हांकीत एकदांचा गांवांत येऊन पोंचलों. खानसाम्याच्या मदतीनें मी पुष्कळ तपास केला. पण मनाजोगी शिकार सांपडेना.

शेवटीं खानसाम्याच्या इच्छेप्रमाणें मी त्याला गांवांत सोडलें; व बंगल्यावर जाण्यासाठीं गाडी परत फिरविली. पण मला गाडी वेगानें चालविण्याचा धीर होईना. हातांत हंटर असलेली साहेबांची ती उग्र मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें उभी होती;— "कांहीं झालं तरी एकटा परत येऊं नकोस," हे त्यांचे हुकमी शब्द माझ्या कानांत घुमत होते.

मला वाटलें, मी तसाच परत गेलों तर—

—तर कधीं न ऐकलेले साहेबांच्या तोंडचे दुःशब्द आज ऐकावे लागतील!

त्यापेक्षां मरण पुरवलें!

या विचारांत मी चूर असतांनाच मला मोटारीच्या दिव्याच्या प्रकाशांत कोणी तरी आकृति समोरून येत असल्याचें दिसलें.

थोडें न्याहाळून पाहतांच मला कळून आलें—

ती आकृति स्त्रीची होती.

तिच्या डोईवर नुकत्याच तोडलेल्या झाडाच्या फांद्यांचा भारा होता. शरीराभोंवतीं घट्ट लेपटलेल्या टाचग्या, ओलसर वस्त्रांतून तिचें पुष्ट यौवन खुलून दिसत होतें.

मोटारीजवळ ती आकृति येतांच मी गाडी थांबवून तिला हटकलें, " एवढ्या रात्रीची कुठं चालली तूं ?"

" गांवांत.—पायांत कांटा भरल्यामुळं उशीर झाला जी फार ! " तिनें अगदीं निर्भय मनानें माझ्या नजरेला नजर देत मला उत्तर दिलें.

तिचें यौवन आणि तिची धिटाई यांत अधिक मोहक काय आहे, हें मला कळेना.

मी तिला खांकरून खालच्या आवाजांत म्हटलें, " गांव तर अजून चांगला मैलभर दूर आहे ! चलते का वरती बंगल्यावर थोडा वेळ ? पोंचवून देईन मग तुला गाडींतून घरीं – "

माझ्या तोंडचे ते शब्द ऐकतांच तिनें विजेप्रमाणें कडकडून मला एकदम शिवी हांसडली,—माझ्या आईबहिणींचा उद्धार केला.

एरवीं कदाचित् मी तिच्या वाटेला गेलों नसतों. पण तिच्या तोंडचे ते दुःशब्द ऐकतांच मला संताप आला;—आपण काय करत आहोंत, याचें भान मला उरलें नाहीं.—

आणि मी तिच्या तोंडांत रुमालाचा बोळा कोंबून, तिच्या धडपडीला न जुमानतां, तिला अल्लद उचलून मोटारींत टाकली; व फेट्याच्या पटक्यानें तिचे हातपाय बांधले.

पांच मिनिटांत गाडी बंगल्याच्या समोर येऊन उभी राहिली.

साहेब लुंगी नेसून पटांगणांत फेऱ्या घालीत होते.

मोटार थांबतांच साहेबांनीं मला करड्या आवाजांत विचारलें, " शिकार मिळाली कीं नाहीं ? "

त्यावर मी खालीं उतरून म्हटलें, " शिकार मिळाली खरी; पण सावज बुजरें आहे ! "

तेव्हां साहेब बेपर्वाईनें म्हणाले, " अच्छा ! तें मी पाहून घेईन. "

मी मुकाट्यानें मोटारींतील ओझें उचलून साहेबांच्या खोलींत आणलें; व तिचे हातपाय सोडले.

हातपाय मोकळे होतांच ती उभी राहून बाहेर जाण्यासाठीं एकदम दाराकडे वळली. त्याबरोबर मी तिला आर्जवून म्हटलें, ' तूं विनाकारण उर्मटपणानं वागूं नकोस. साहेब तुझ्या इच्छेविरुद्ध तुला त्रास देणार नाहींत. "

साहेब माझ्यामागें उभें राहून तिच्याकडे टक लावून पहात होते. तिच्या मादक यौवनानें त्यांच्या डोळ्यांवरील मदिरेचा अमल आतां उतरला होता;—त्यावर दुसरी नशा चढली होती.

ते तोंडांतील सिगरेट फेंकून देऊन एकदम मला म्हणाले, " शराबाचे पेले भर आधीं !—मग पहातों मी—"

ती तरुण स्त्री रागानें फणफणत भिंतीला टेकून उभी होती.

साहेब खुर्चीवर बसून तिच्याकडे पहात होते.

मी पेले भरून टेबलावर ठेवले व खोलींतून बाहेर पडलों.

मोटार गॅरेजमध्यें नेऊन ठेवली; व आवाराच्या उतरणीकडील टोंकाला जाऊन बसलों.

माझें मन अतिशय व्यथित झालें होतें. आपण केलें तें बरें केलें नाहीं, अशी डागणी सारखी माझ्या मनाला विवेकबुद्धि देत होती.

ती स्त्री अत्यंत नाखूष आणि साहेब तर बेफाम झालेले !—

मी तिथें बसलों होतों;—पण माझें मन मात्र त्या खोलींत घुटमळत होतें. माझ्या डोळ्यांना तिथें घडत असलेला प्रत्येक प्रकार दिसत होता—

प्रथम साहेबांचे रागाचे शब्द माझ्या कानांवर आले, त्यानंतर कांहीं वेळानें हंटरचा आवाज आणि त्याच्या मागोमाग अशरणतेनें दिलेला हुंदका !

तो हुंदका कानांवर पडतांच माझ्या अंगावर थरारून शहारे आले.—मी तसाच उठून खोलीकडे धांवलों.—

तोंच त्या खोलीच्या खिडकींतून त्या तरुण स्त्रीनें खालीं उडी टाकली.

मी पुढें गेल्यावर मला दिसलें—

ती विवस्त्र होती, तिच्या मोकळ्या सुटलेल्या अस्ताव्यस्त केंसांनीं तिचें तोंड झांकलें होतें.

मला पहातांच ती धांवतच आवाराच्या दरीकडील बाजूला वळली.

तिचा उद्देश तत्क्षणींच माझ्या लक्षांत आला; मी तिच्या पाठोपाठ धांवलों; व वाऱ्यानें मागें उडत असलेले तिचे केंस धरण्यासाठीं हात पुढें केला.——

——त्या केंसांच्या अग्रांचा स्पर्श माझ्या बोटांना झाला, तोंच तिनें आवाराच्या टोंकाशीं असलेल्या उंच पाषाणावर चढून आपलें शरीर खालच्या दरींत फेंकून दिलें.

मी दिङ्मूढ होऊन तें दृश्य पहात उभा राहिलों. माझ्या दृष्टींतली, माझ्या वाणींतली, माझ्या पायांतली सारी शक्ति जणूं नष्ट झाली.

साहेब माझ्याजवळ येऊन उभे राहिले होते.

आम्ही दोघांनीं एकवार वांकून मुकाट्यानें खालीं पाहिलें.——

——पण दरीच्या तळाशीं असलेल्या गडद अंधारांतून कसलाहि आवाज वर आला नाहीं.

कांहीं क्षण तिथें थांबून साहेब खोलींत परत आले. बराच वेळ ते लिहित होते. नंतर त्यांनीं हांक मारली, "बेटा उमेद——"

मी आंत जाऊन त्यांच्यासमोर उभा राहिलों. त्यांचा चेहरा अगदीं शांत होता. मला ते संथपणानें म्हणाले, "या पत्रांत मी सारी हकिकत लिहून ठेवली असून, घडलेल्या प्रकाराची सर्व जबाबदारी माझ्यावर असल्याचं स्पष्ट नमूद करून ठेवलं आहे. मला आतां जिवंत रहाणं शक्य नाहीं. तुला जन्मभर सुखानं रहातां येईल अशी व्यवस्था मी करून ठेवली आहे——"

ते बोलतां बोलतां उठले व माझ्याजवळ येऊन म्हणाले, "उमेद, आतां हीच आपली शेवटची भेट. बेटा, तुझं कल्याण होवो——"

त्यांनीं माझे हात आपल्या हातांत घट्ट धरले व माझ्या कपाळाचें चुंबन घेतलें.

नंतर त्यांनीं आपली बंदुक उचलली व मला बाहेर जावयाला सांगितलें.

त्यांच्या त्या वर्तनाचा अर्थ माझ्या लक्षांत आला. ज्या अविचारी कृत्याबद्दल मीच खरोखरी मूळांत जबाबदार, त्याच्या पायीं त्यांनीं आत्महत्या करावी, ही कल्पना मला सहन झाली नाहीं. मी परोपरीनें त्यांची समजूत घातली;——त्यांना निक्षून सांगितलें कीं, तुम्ही आत्महत्या केलीत, तरीसुद्धां मी खरा प्रकार पोलि-

सच्या कानांवर घालून या कृत्याचं प्रायश्चित भोगीन आणि तुमच्या एका पैलाहि शिवणार नाहीं.—

आम्ही किती तरी वेळ बोलत होतों.—शराबाच्या मध्यस्थीशिवाय एकमेकांशीं बोलण्याचा तो पहिलाच प्रसंग होता आमचा.—बोलतां बोलतां पहांट झाली.

शेवटीं गुन्ह्याची सर्व जबाबदारी मी आपल्या डोक्यावर घ्यावी, या गोष्टीला साहेब कबूल झाले. आणि, चार महिन्यांनीं सारे कायदेशीर विधि यथासांग झाल्या-वर, मी या तुरुंगांत आलों. लोकांच्या ध्यानांत खरा प्रकार अर्थातच आला. पण साहे-बांच्या वजनामुळें व मी गुन्ह्याची बिनशर्त कबुली दिल्यामुळें त्यांना खटल्यांत गोंवणें पोलिसांना शक्य झालें नाहीं. मात्र खटला चालू असतांना साहेबांचा दोनदां धीर खचून ते स्वतःच पोलिसच्या स्वाधीन व्हावयाला तयार झाले होते.

तुरुंगांत मला जादा सवलती मिळाव्यात, अशी सर्व व्यवस्था त्यांनीं केली; व दर पंधरा दिवसांनीं ते मला येऊन भेटत असतात. खरोखरी बाबूजी, इतका प्रेमळ मालिक मिळणें कठिण.

सहा वर्षें झालीं त्या प्रसंगाला आतां. पण, त्याची आठवण झाली, म्हणजे मला उन्माद चढतो जसा कांहीं;—माझें मन खात असतें सारखें मला! गेल्या सहा वर्षांत कोणाचेंहि लक्ष माझ्या या मनोव्यथेकडे गेलें नाहीं. तुम्हीं आज हा प्रश्न विचारलात न् मी आजपर्यंत कुणालाहि न सांगितलेली ही हकिकत तुम्हांला सांगितली.—"

कांहीं वेळ आम्ही दोघेहि स्तब्ध होतों. नंतर मी त्याला हळूच म्हटलें, "सरदारजी, मला तुमच्या इमानदारीचं आश्चर्य वाटतं—

"जगांत इमानदारीशिवाय चहाण्यासारखं दुसरं काय आहे बाबूजी!" तो हंसून उद्गारला.

आणि त्याच्या डोळ्यांत एक प्रकारचें विलक्षण तेज लकाकलें.

मला वाटलें, जणुं शुक्राचें चांदणेंच माझ्या अंगावर पडत आहे.

—ज्योत्स्ना, जुलै १९३६

*

## बेकार

बंगल्याच्या आवारांत आमची मोटार शिरते न शिरते, तोंच एक छोटेखानी लँडोकार भगभग करीत आमच्या अंगावर आली.

" हॅलो बाबू ! आज इकडे कोणीकडे ?—"

" आप्पासाहिबांकडे ! सायन्स कॉंग्रेस आली ना आतां दीड महिन्यावर ! तूं काय टेनिस खेळायला चालला आहेस भय्या ?—मजा आहे बुवा तुझी ! "

" तुला कोणी मजा करायला नको म्हटलंय बाबू ! पण वर्तमानपत्रांत नांव येईल या आशेनं लष्करच्या भाकऱ्या भाजायला हव्यात तुम्हांला !—आप्पासाहेब व्हरांड्यांत वाचीत बसले आहेत—"

आणि ती गाडी भगभग करीत पुढें चालू झाली.

जुनाटपणा झांकण्यासाठीं त्या मोटारला दिलेला भडक तांबडा रंग, तिच्यामागें असलेल्या बैठकीचें डबडेवजा स्वरूप व ती हांकणाऱ्या तरुणाच्या डोक्याला पडलेलें तुकतुकीत टक्कल या साऱ्याच गोष्टी मोठ्या चमत्कारिक होत्या. म्हणून मी बाबूला विचारलें, " हा कोण रे तुला लष्करच्या भाकरी भाजायला लावणारा गांवठी साहेब ? "

" अरे, हे सरसाहेबांचे थोरले चिरंजीव ! आय. सी. एस. होण्यासाठीं म्हणून विलायतेला गेला न् आठ वर्षांनीं मोठ्या मुष्किलीनं बॅरिस्टर होऊन परत आला—"

" मग वकिली कशी काय चालते याची ? "

" कसली आली आहे वकिली ? बापाच्या नांवामुळं काय काम येत असेल तेवढंच ! ते बैठी सल्ला मसलत देऊन जेवढा पैसा हबकतात, त्याच्या एक शतांश नाहीं मिळत याला उभ्या वर्षांत ! चार तास कसेबसे कोर्टांत काढायचे;

तिथून आल्यानंतर क्लबांत जाऊन टेनिसकोर्टावर हुंदडायचं; न् दिवसांतून जितक्या वेळां पितां येईल तितक्या वेळां प्यायची असा कार्यक्रम आहे याचा ! ”

बाबुराव मला ही माहिती देत आहे, तोंच आमची गाडी बंगल्याच्या कमानीखालीं येऊन उभी राहिली.

बंगला मोठा खरा, पण मोडकळीस आल्यासारखा झाला होता. कमानीच्या बळकट खांबांवर चढविलेल्या वेली अर्धवट सुकून गेल्यामुळें म्हाताऱ्या माणसाच्या हातांवरील जरड शिरांसारख्या दिसत होत्या; व आवारांतील आंखीव पदपथांवर मधून मधून वाढलेलें गवत टक्कल पडलेल्या डोक्यावर शिल्लक उरलेल्या केंसांच्या झुपक्यांसारखें वाटत होतें.

आम्हीं आवाज न करतां अदबीनें पायऱ्या चढून वर आलों.

सरसाहेब वेताच्या खुर्चीवर रेलून ‘ स्टेट्स्मन ’ चा नुकताच आलेला अंक वाचीत होते. त्यांनीं इटालियन पांबीजचा करड्या रंगाचा सायंकालीन पोषाख घातला होता. आमची चाहूल लागतांच डोळ्यांना लावलेलीं भिंगें त्यांनीं काढलीं; हात एकत्र आणून नमस्काराचा आविर्भाव केला; व तोंडांतील अर्धा अधिक जळलेला चिरूट न काढतांच ‘ गुड ईव्हनिंग ’ म्हटलें.

सरसाहेबांना प्रत्यक्ष पहाण्याचा तो माझा पहिलाच प्रसंग होता. आपल्या घणाघाती ( hammering ) वक्तृत्वानें न्यायाधीशावर दडपण आणून खटला जिंकण्याच्या कौशल्याबद्दल त्यांची ख्याति होती; व त्यांचीं मतें जरी मवाळ होतीं, तरी वक्तृत्व मात्र मोठें जहाल असे. मॉंटफोर्ड सुधारणा अंमलांत येऊन नव्या कायदेमंडळाची स्थापना झाल्यावर मध्यप्रांत सरकारनें गृहमंत्रिपदावर त्यांची योजना करून लोकपक्षाला शह देण्याच्या कामीं त्यांचें वक्तृत्व राबवून घेतलें. ते जवळ जवळ आठ वर्षें मध्यप्रांत सरकारचे गृहमंत्री होते; व त्यानंतर चार महिने हंगामी गव्हर्नर होण्याचा बहुमान त्यांना देऊन सरकारनें त्यांचा निरोप घेतला.

आम्ही जवळ जातांच त्यांनीं हातानें खूण करून आम्हांला टेबलाभोंवतीं मांडलेल्या खुर्च्यांवर बसण्याची सूचना केली; व भुंवया जवळ जवळ मुळींच

नसलेलें आपलें गोरेंपान भव्य कपाळ किंचित् चढवून बाबुरावाकडे प्रश्नार्थक मुद्रेनें बघितलें.

"मी सायन्स कॅंग्रेसच्या कामासाठीं भेटायला आलों आहे आपल्याला," त्यानें अत्यंत नम्रतेनें प्रस्तावना केली.

"अरे हो! तूं सायन्स कॉलेजांत प्रोफेसर आहेस नाहीं का आतां? कसं काय चाललं आहे तुझं?—"

वास्तविक सरसाहेबांच्या शिफारशीमुळेंच ती जागा त्याला मिळाली होती. पण त्यांना मात्र त्या गोष्टीचा विसर पडला होता.

'चांगलं चाललंय माझं! पुढच्या वर्षी डॉक्टरेट घेण्यासाठीं विलायतेला जाण्याचा विचार आहे—'

"अस्सं! ए क्लासवर उडी दिसतेय तुझी! अलीकडे ही टूमच होऊन बसली आहे एक.—अभ्यासाची रजा काढून इंग्लंडांत जायचं, डॉक्टरेटच्या जोरावर ए क्लास मिळवायचा न् मग कांहींहि संशोधन न करतां सारं आयुष्य चैनींत घालवायचं!—"

"पण ए क्लास मला इतक्या सहजासहजीं मिळायला मी बंगाली, मद्रासी किंवा मुसलमान थोडाच आहें?—"

"कां बरं?—सध्यां शिक्षणमंत्री तर आपला महाराष्ट्रीय आहे—"

"शिक्षणमंत्री महाराष्ट्रीय असला, तरी मी ब्राह्मण आहे ना? मी ब्राह्मणेतर असतों तर कदाचित् आपण म्हणतां तो आरोप होऊं शकला असता माझ्यावर!"

बाबुरावाचे हे उद्गार ऐकून सरसाहेब कांहीं बोलले नाहींत. फक्त त्यांनीं स्मित हास्य केलें. आणि मागें वळून किंचित् मोठ्या आवाजांत त्यांनीं हांक मारली—

"हिरण्णा, अरे हिरण्णा—"

त्याबरोबर शुभ्र पोषाख केलेला काळगेला, ठेंगू खानसामा त्यांच्यासमोर येऊन उभा राहिला.

"हें पहा. चहा आण थोडा न् फराळाचंहि घेऊन ये कांहीं दिवाळीचं!—"

नंतर आमच्याकडे वळून सरसाहेब पुन्हा बोलूं लागले.

" खरं आहे तुझं म्हणणं बाबू ! मी गृहमंत्री असतांना किती महाराष्ट्रीय ब्राह्मण मी न्यायखात्यांत भरले म्हणून प्रश्नांचा मारा केला होता माझ्यावर एका हिंदुस्थानी सभासदानं ! पण, युनिव्हर्सिटींत न् सेक्रेटरीएटमध्यें सारे बंगाली न् मद्रासी भरले आहेत, यान्याविरुद्ध मात्र कधीं ब्र काढायचा नाहीं कोणी महाराष्ट्रीय सभासद ! आमच्यांत जिथं एकी नाहीं, तिथं दोष कुणाला द्यायचा ? ब्राह्मण प्रभूला पाण्यांत पहाणार, प्रभू मराठ्याला पाण्यांत पहाणार, मराठा कुणब्याला पाण्यांत पहाणार असा प्रकार आहे सारा !—बरं, पण तूं कामाचं स्वरूप नाहीं सांगितलंस अजून मला आपल्या—"

" काम तसं विशेष नाहीं.—आपण स्वागतमंडळाचं सभासद व्हावं न् कांहीं तरी देणगी द्यावी म्हणून विनंति करायला आलों आहे मी."

" अरे, माझा न् सायन्सचा काय संबंध ? "

" असं कसं म्हणतां आपण ? आपला न् सगळ्या मध्यप्रांत–वऱ्हाडचा संबंध आहे. प्रांतांत लोकहिताचं म्हणून जें जें कांहीं कार्य निघेल त्याचा हक्क आहे आपल्यावर—"

" माझ्यावर म्हणण्यापेक्षां माझ्या चेक बुकावर म्हण ! तुम्हां लोकांची अशी कल्पना असते का रे कीं तुम्हांला देणग्या देण्याशिवाय आम्हांला दुसरी कांहीं जबाबदारी नाहीं ? "

बोलतां बोलतां त्यांनीं समोरच्या वेताच्या टेबलावर ठेवलेल्या पेटींतील एक चिरूट घेऊन तो पेटवला व आमच्यापुढें पेटी सारली.

पण त्यांच्या त्या धूम्रपानाच्या आमंत्रणाला साभार नकार देऊन बाबुराव म्हणाला, " मग आपल्यासारख्या बड्या लोकांकडे जर आम्ही यायचं नाहीं, तर आम्हां जायचं तरी कुणाकडे ? "

" आम्ही बडे ? " सरसाहेब तोंडांतला चिरूट काढून मोठ्यानें हंसले. " कोणी सांगितलं तुला मी बडा आहें म्हणून ? अरे, मी काय बुटी, घटाटे का चिटणीस–आहे तरी कोण ? माझी सावकारी नाहीं कीं मालगुजारी नाहीं ! रोज मिळवावं न् खावं असा क्रम आहे माझा गेलीं पस्तीस वर्षें ! आमच्या सारख्यांच्या

परिस्थितीची कांहीं कल्पना नसते लोकांना! वकिली सोडून मी गृहमंत्री झालों, यांत पैशाच्या दृष्टीनं माझं केवढं नुकसान झालं हें माझं मलाच माहित! लोकांना जर मी म्हणूं लागलों कीं, गृहमंत्री होण्यांत स्वार्थत्याग आहे माझा, तर तें पटायचें नाहीं त्यांना! शिवाय गृहमंत्री झाल्यापासून जी खर्चिक युरोपियन रहाणी घरांत शिरली, ती सुटत नाहीं आतां ते दिवस गेले तरी! नातवंडांपासून सगळ्यांना चटक लागली आहे त्या रहाणीची—"

ते बोलत असतांनाच हिरण्णानें टेबलावर स्वच्छ कपडा घातला; व चहाचें सामान त्यावर आणून ठेवलें. सरसाहेब चहा तयार करीत आहेत, तोंच करंज्या, लाडू, चकल्या, लोणी वगैरे पदार्थांनीं भरलेल्या तीन शुभ्र बशाहि त्यानें आणून ठेवल्या.

त्यांतील एक चकलीचा तुकडा तोंडांत टाकून सरसाहेब आम्हांला म्हणाले, " हं, सुरवात करा आतां—"

त्याबरोबर बाबुरावानें चहाचा घोट घेऊन त्यांना हळूच म्हटलें, " आपण हंगामी गव्हर्नर असतांना आपली दक्षिण आफ्रिकेंत एजंट जनरल म्हणून नेमणूक होणार असं ऐकलं होतं आम्ही—"

" अरे, वर्तमानपत्री गप्प होती ती एक! माझ्यासारख्या माणसाला दक्षिण आफ्रिकेंत एजंट नेमायला काय वेड लागलंय सरकारला! माझ्या कारकीर्दीच्या शेवटीं मला चार महिन्यांसाठीं गव्हर्नर नेमून न् नाइटहूड देऊन सरकारनं जी माझी बोळवण केली, ती या हेतूनं कीं, पुन्हा कधीं या गृहस्थाचं तोंड पहाण्याचा प्रसंग नको! त्यानंतर इतकीं कमिशनं न् कमिट्या नेमल्या गेल्या, पण त्यावर दिसली आहे कधीं माझी नेमणूक झालेली तुम्हांला? नाहीं तर सरकारचीं जीं आवडतीं माणसं असतात, त्यांना सरकार कधीं विसरत नाहीं. प्रांतिक कौन्सिलांतून असेंब्लींत, असेंब्लींतून इंडिया ऑफिसांत, नाहीं तर हाय कमिशनरच्या किंवा एजंट जनरलच्या जागीं अशी बढती होत रहाते त्यांची;—निदान पक्षीं कमिशनं न् कमिट्या यांच्यावर सारखी वर्णी लागत राहून कोणत्या ना कोणत्या तरी रूपानं तनखा चालू रहातो त्यांचा अव्याहत. पण मी थोडाच

सरकारचा आवडता आहे ?—माझ्या खात्यांत मी कधीं हात घालूं दिला नाहीं इतरांना; झाडून साऱ्या गोऱ्या हपिसरांना त्यांच्या पायरीनं वागवलं; असहकारितेच्या काळांत सर्वांत कमी दडपशाही झाली आपल्या प्रांतांत !–खिशांत राजीनामा ठेवून कार्यकारी कौन्सिलच्या बैठकीला हजर रहाणारा मी—! मी नोकरींतून निघालों, तेव्हां सरकारला आपल्या मागची एक ब्याद टळली असं वाटलं असेल !—"

"पण मग आपण प्रांतिक कौन्सिलासाठीं का नाहीं उभे रहात ?—आपल्याला आनंदानं निवडून देतील लोक !—"

"छे रे, भ्रम आहे हा तुझा ! लोकांना नुसतं चकाकणारं नाणं पाहिजे ! मग तें सोनपितळी कां असेना ! त्यांतून आतां हें कायदेमंडळं न् राज्यघटना मोडून टाकण्याचं खूळ निघालं आहे ना ! जशी कांहीं राज्यघटना म्हणजे शाडूची बैलगाडीच आहे एक ! लॉयड जॉर्जनं म्हटल्याप्रमाणं पोलादी चौकट आहे ती; न् तुमचा केव्हढाहि जहाल पुढारी असला तरी त्या चौकटींत जाऊन बसल्यावर तिच्यासारखा आकार येऊं लागतो त्याला हळुहळू ! पण तोंडानं राज्यघटना मोडण्याच्या वल्गना करायला काय लागतं ? रा. ब. नारायणराव केळकर यांच्यासारखा हुषार न् करारी दिवाण झाला नाहीं दुसरा हिंदुस्थानांत. पण ते जेव्हां निवडणुकीला उभे राहिले, तेव्हां 'महाराष्ट्रा' नं काय लिहिलं होतं आठवतं तुला ?—"दिवाणगिऱ्या यशस्वी करण्याचा जर प्रश्न असता तर आम्ही केळकरांनाच निवडून द्या असं सांगितलं असतं लोकांना. पण आम्हांला कौन्सिलांत आमचे प्रतिनिधी पाठवायचे आहेत, ते दिवाणगिऱ्या यशस्वी करून दाखविण्यासाठीं नव्हे तर कौन्सिलं न् राज्यघटना मोडून टाकण्यासाठीं !"—असल्या विचित्र युक्तिवादापुढें कोणाची अक्कल चालणार ? खरोखरीच टिळक जर आज हयात असते, तर आमच्यासारख्या अनुभवी माणसांचा योग्य उपयोग करून घ्यायला चुकले नसते कधीं ! पण या गांधीनीं हद्दपार केलं आहे जसं कांहीं आम्हांला राजकारणांतून !—"

बोलतां बोलतां त्यांनीं एक उसासा टाकला; व किटलींतील उरलेला

काळसर लाल चहा कपांत ओतीत ते म्हणाले, "अरे हिरण्णा, चहा आण आणखी थोडा!—खरोखरी, गृहमंत्र्याची जागा स्वीकारल्यामुळें माझं सगळ्या बाजूंनीं नुकसान झालं बाबू! मी कितीहि नेकीनं न् कणखरपणानं वागलों असलों, तरी लोकांना थोडाच आतां विश्वास वाटायचा आहे माझा? बरं, माझ्यासारखा गव्हर्नरच्या जागेपर्यंत चढलेला मनुष्य जर आतां पुन्हा कोर्टांत जाऊन वकिली करायला लागला, तर लोक तिकडूनहि नांवं ठेवायला तयार! जुन्या राजवटींत पदव्यांबरोबर सरंजामहि देत असत; न् त्यामुळं इतमामानं रहातां येत असे माणसाला. पण या इंग्रजी राज्यांत सारे बहुमान पोकळ!—अरे चहा घ्या ना थोडा आणखी—"

त्यांनीं पुन्हा कप भरावयाला सुरवात केली. ती संधि साधून बाबूनें आपल्या खिशांतून हळूच पावती पुस्तक बाहेर काढलें; व त्यांतील सदरें भरून तो म्हणाला, "देणगीचा आंकडा किती टाकूं आपल्या नांवापुढं!"

"देणगी?—अरे मी स्वागतमंडळाचा सभासद होणार तोसुद्धां तूं इतक्या दिवसांनीं भेटायला येऊन शब्द टाकलास म्हणून!"

"पण आपल्या सारख्यांनीं नुसतं सभासद होऊन कसं चालेल?"

"पुन्हा आणलंस तूं हें 'आपल्यासारख्यांचं' तुणतुणं! अरे, प्रांतांतल्या बेकारांची जर यादी करण्याचा प्रसंग आला उद्यां, तर तींत पहिलं नांव माझं न् दुसरं आमच्या भय्याचं घालावं लागेल!—"

बाबुरावानें मुकाट्यानें पावती फाडून सरसाहेबांच्या समोर ठेवली.

—ज्योत्स्ना, ऑक्टोबर १९३६



# अश्विनीचें औक्षण

"मधू, अरे मधू, मधू, अ!—अगबाई, ओ कां नाहीं देत आज हा?—" असें म्हणत शांतानें उंबरठ्याच्या आंत पाऊल टाकलें.

ती तशीच पुढें जाणार, तोंच अगदीं अनपेक्षित देखावा तिच्या दृष्टीस पडून तिचे पाय जागच्या जागीं थबकले; व आश्चर्यमिश्र आनंदाच्या ऊर्मि तिच्या मुखमंडलावर उठल्या. माजघरांतील लोंबत्या दिव्याचा झगझगीत प्रकाश तिच्या तोंडावर पडला होता. ती रुईफुली कांठाचें काळें पातळ नेसली होती. काळ्याभोर ढगांच्या विरल पटलांतून आकाशाचा मूळचा अस्मानी वर्ण जसा उठून दिसावा, तशी तिची सतेज, सांवळी अंगकांति त्या काळ्या झिरझिरींत पातळांतून खुलून दिसत होती. तिचा चेहरा वाटोळा नव्हता किंवा नाकहि सरळ नव्हतें. परंतु तिच्या विशाल नेत्रांत एक प्रकारचें प्रखर पण आकर्षक तेज असल्यामुळें तिचा रेखीव नसलेलाही चेहरा अतिशय मोहक दिसत असे. तिचे गाल फुगीर होते; व तिच्या लहानशा दळदार ओंठांच्या किंचित् आंत दबलेल्या पाकळ्या तिच्या कोमल पण करारी स्वभावाची साक्ष देत. तिच्या रेशमासारख्या मऊ, काळ्या व विपुल केंसांची सर्पाकृति सैल वेणी तिच्या स्कंधप्रदेशाकडे रुंदावत गेलेल्या नाजूक मानेवर ऐटीनें रेललीं होती. पण, केंसांना तेल लावण्याचा तिला मनस्वी कंटाळा असल्याकारणानें, कबरीबंधनांतून निसटलेले पुढले कांहीं खट्याळ कुरळ तिच्या भव्य कपाळावर झेंपावले होते. तिच्या कानांतील कुड्यांच्या मोत्यांचे किरण गालांवर पडून स्मितामुळें किंचित् विशद झालेल्या तिच्या शुभ्र दंतपंक्तीची शोभा द्विगुणित झाली होती. चालण्याच्या भरांत असतां, ती एकाएकीं उंबरठ्यावर थबकल्यामुळें, तिच्या शरीराच्या वरच्या भागाचा तोल मागें झुकून तिच्या सडपातळ पण भरदार अंगयष्टीला मनोहर बांक आला होता. माजघरांतलें दृश्य नजरेला पडतांच

तिनें आपले दोन्हीही हात कुतूहलानें वर उचलून आपल्या उमलत्या उरोभागा-जवळ नेले होते.

" अश्विनीच्या ओंवाळणीची तयारी चाललीय वाटतं?—माझ्या लक्षांत नव्हतं आज मधूला ओंवाळायचंय् हें,"—असें म्हणत ती हंसत हंसत पुढें आली.

" बरी आलीस, तुझी वाटच पहात होतें मी, ताई. आमच्या मधूबरोबर मी तुलाही पण ओवाळणार आहे आज. तुझ्या आईची तूं वडील मुलगी नसलीस, तरी आमच्या मधूची तूं ताई आहेस ना ? हो ना रे मधू ?—" लीलाबाई तिच्याकडे कौतुकानें पहात मोठ्या प्रेमानें म्हणाल्या.

आईच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच चिमुकला मधु उद्‌गारला, " ताई, तू बछछिल ना माझ्या पातावल; आई तुला पन ओवालिल—"

त्या मायलेकरांचे हे उद्‌गार ऐकून शांताचा चेहरा गोरामोरा झाला. तिच्या आईला दोन मुलें होऊन तीं पाळण्यांतच वारलीं. त्यानंतर शांता झाली. शांताच्या पाठीवर पुन्हा रमाबाईंना तीन मुलें होऊन तीं गेलीं होतीं. त्यामुळें साहजिकच शेजारणी पाजारणी त्यांना नेहमीं म्हणत, " तुमच्या शांतीचं तुम्ही एकदां लवकर लगीन करून टाका; एरवीं कांहीं तुमचीं मुलं वाचायचीं नाहींत !" पण रमाबाईचें उत्तर यावर ठरलेलें असे. त्या म्हणत, " नाहीं माझीं मुलं जगलीं तरी चालतील. पण तेवढ्यासाठीं कांहीं मी माझ्या पोरीच्या गळयाला लग्नाचा तांत लावायची घाई करणार नाहीं. माझीं पहिलीं दोन मुलं गेलीं तीं तर कांहीं तिच्यामुळं नव्हत ना ?—माझंच नशीब खोटं !" शांताचें घरांत होणारें कोडकौतुक आणि विशेषतः मुलासारखे होणारे लाड शेजाऱ्यांना व नातलगांना पहावत नसत. " किती झालं तरी मुलगी ती मुलगी; अखेर दुसऱ्याच्याच घरीं जायची ना ? इतकींत कशाला तिचीं एवढीं थेरं !—" अशी धुसफुस नेहमीं घरांत व घराबाहेर चाललेली शांताच्या कानांवर पडे. त्यामुळें समजावयाला लागल्यापासून तिला स्वतःलाही केव्हां केव्हां असें वाटे कीं, " आपलं लग्न होऊन आपण एक वेळ लवकर सासरीं गेलेलं पुरवलं; पण

आपल्या पाठीवर एखादा तरी भाऊ होऊन तो जगावा." लीलाबाईंचे ते उद्गार ऐकतांच, आपल्या पाठचीं मुलें जगत नाहींत, हा आपल्याविषयींचा लोकापवाद मनांत येऊन, तिला एकदम कसेंसेंच वाटलें.

पण तिच्या मनाची ही स्थिति लीलाबाईंच्या लक्षांत आली नाहीं. त्या ओंवाळणीची तयारी करण्यांत गर्क होत्या. आज कोजागिरी पौर्णिमा होती. आश्विन मासांतील या पौर्णिमेला घरांत जें वडील मूल असेल त्याला ओंवाळण्याची चाल नागपूर प्रांतांत आहे. मधु हा लीलाबाईंचा जरा उशिराच झालेला पहिला मुलगा. शांताला मुलांची फार आवड. परंतु तिला स्वतःचीं अशीं भावंडें नसल्यामुळें, मधूसारख्या शेजारच्या मुलांना खेळवून, तिला आपल्या मनाची आर्तता पुरवावी लागे. मधूवर तिचें अत्यंत प्रेम होतें; व त्यालाहि गुलामाला तिचा अतिशय लळा लागला होता. तो सदा आपल्या ताईबरोबर असावयाचा. ताईनें काऊचिऊला टिवल्या बावल्या दाखविल्याविना त्याचें जेवण होत नसे. लीलाबाईंना त्यांच्या या प्रेमाचें फार कौतुक वाटे. आज अश्विनी असल्यामुळें त्यांनीं मधूला चांदण्यांत ओंवाळण्याचा बेत केला होता.

चंद्र नुकताच उगवला होता. पूर्वेकडील क्षितिज निरभ्र नसल्यामुळें त्याच्या कांतीची खुलावट अद्याप व्हावी तशी झाली नव्हती त्याच्याभोंवतीं रेंगाळणारे अभ्रपुंज मात्र त्याचें तेज उसनें घेऊन क्षितिजावर झळकत होते. त्याच्या बिंबाचा पिंवळ रपणाही अजून कमी झाला नव्हता. त्यांतच दोन पांढऱ्या शुभ्र अभ्ररेषांनीं चंद्रबिंब मधोमध विभागलें गेल्यामुळें त्याचीं तीन शकलें झाल्यासारखीं दिसत होतीं. चंद्रोदयाच्या वेळीं क्षितिजावर चमकणाऱ्या अश्विनीच्या तारका आतां रांगोळीच्या ठिपक्यांसारख्या दिसत होत्या. चंद्र उगवल्याबरोबर सुटलेल्या मंदशीतल वाऱ्यानें झाडांचीं पानें सळसळूं लागून, अंगणांतील चमेलीच्या फुलांचा आतांपर्यंत वेलीच्या मांडवांतच घुटमळून राहिलेला सुवास वाऱ्याच्या झुळकेबरोबर बाहेर पडला. इतक्यांत क्षितिजावरील ढगांचे पुंजके वाऱ्यानें पांगले जाऊन चंद्राच्या प्रसन्न सुषमेनें सृष्टि उल्लसित झाली.

लीलाबाईनीं औक्षणाची सर्व तयारी अंगणांत आधींच करून ठेविली होती. चांदीच्या फुल्यांच्या रंगीत पाटांवर शाल घालून त्यावर गव्हाचा चौक काढला होता. पाटाच्या चारी बाजूंना माड्या तेवत होत्या. चंद्रप्रकाशांत ठेवण्यासाठीं घरांतील आटीव दुधाची पातेली घेऊन त्या अंगणांत आल्या. त्यांच्या मागोमाग शांताहि मधूला कडेवर घेऊन बाहेर आली. अंगणांत आल्या-बरोबर चंद्रबिंबाकडे बोट दाखवून ती मधूला म्हणाली, "तो पाहिलास कां चांदोमामा कसा छान छान दिसतोय् तो ? आतां किनई आई आधीं चांदो-मामाला ओंवाळील अन् मग कुणाला ओवाळील सांग बरं मला ?"

"मग तुला ओवालील," मधूनें उत्तर दिलें.

"अहा रे वेडया ! एवढंसुद्धां नाहीं कां कळत ! मग किनई आमच्या मधूला ओवाळील; अन् मग गोड गोड दूध देईल," शांता त्याचा गालगुच्चा घेत म्हणाली.

हा त्यांचा संवाद चालला असतां लीलाबाई ओवाळणीचें साहित्य घेऊन अंगणांत आल्या. निमंत्रित बाळगोपाळही मधूबरोबर दूध घेण्यासाठीं तेथें येऊन थडकले; व शांताची आई वगैरे शेजारच्या बायकाहि तो समारंभ पहावयाला आल्या. शांता नको नको म्हणत असतां तिला त्यांनीं बळेंच प्रेमानें पाटावर बसविलें; व मधूला तिच्या मांडीवर दिला. आपल्या कानांतील कुडीं काढून तीं त्यांनीं ओवाळणीच्या तबकांत टाकलीं. आणि त्या उभयतांना त्यांनीं सोन्यामोत्यानें ओवाळलें. शांताची आई जवळच उभी राहून तें दृश्य-पहात होती. आपल्या लेकीच्या मांडीवर बसलेल्या मधूला पाहून त्यांना आपल्या वर्ष दीड वर्षाचा होऊन गेलेल्या शांताच्या पाठीवरील मुलाची आठवण झाली; व त्यांच्या डोळ्यांतून घळ्कन् अश्रुबिंदु खालीं पडले. मुलाला ओवाळण्याच्या गडबडींत असलेल्या पाठमोऱ्या लीलाबाईंच्या लक्षांत हा प्रकार आला नाहीं. पण आईच्या डोळ्यांतील अश्रु पहातांच शांताचेही डोळे पाण्यानें भरून आले.

"रडायला ग काय झालं वेडे तुला ? मधु झाला तरी तुला भावा-सारखाच कीं नाहीं ? तुझ्या आधींचीं भावंडं नाहींत, तर तूंच आतां वडील

मुलगी. तुझ्या आईनं तुला ओवाळलं नाहीं म्हणून मी ओंवाळतें. त्यांत एवढ वाईट वाटायला ग काय झालं?—वेडी कुठली!—" लीलाबाई कळवळ्यानें म्हणाल्या.

"आमची ताई वेली आहे, आमची ताई वेली आहे! उगीतत् ललते—" असें म्हणत मधूनें तिच्या मानेला विळखा घातला.

*  *  *  *

"मधू, अरे मधू, मधुबाळ! गेलायस तरी कुठं बाबा?—" हे शब्द लीलाबाईनीं अत्यंत कष्टानें उच्चारले. हांक मारण्याच्या श्रमानें त्यांना दम लागला. त्या आपल्या अंथरुणावर बसल्या होत्या. त्यांनीं आपला एक हात गुडघ्यावर ठेवला होता; व त्या हाताच्या तळव्यावर पुष्कळ दिवस न विंचरल्यामुळें विस्काळित झालेल्या केसांनीं अर्धवट झांकलेलें आपलें निस्तेज तोंड टेकलें होतें. आज शरदृतूंतील पहिली पौर्णिमा. परंतु आभाळ कुंद असल्यामुळें चंद्राभोंवती खळें पडून त्याचें निष्प्रभ चांदणें धुक्यासारखें दिसत होतें. लीलाबाईच्या डोळ्यांना त्रास होऊं नये म्हणून मुद्दाम लावलेल्या निळ्या चिमणींतून लोंबत्या दिव्याचा अंधुक प्रकाश माजघरांत पडला होता. थोडा वेळ थांबून त्यांनीं हांक मारावयाला प्रारंभ केला

"मधुबाळ, अरे मधू!—क्षणभरसुद्धां नाहीं ना रे तुला माझ्यापाशीं बसावसं वाटत!"—पण हे त्यांचे शब्द ओठांतल्या ओठांतच जिरले. शांताचें बोट धरून मधु आणि शांता घरांत येत असलेलीं त्यांच्या दृष्टीस पडलीं. मुलाला पहातांच त्यांना गहिंवर आला; पण तो दाबून त्या म्हणाल्या, "किती रे मारायच्या हांका तुला बाळ! करकरीत तिन्हीसांजा बाहेर जाऊं नकोस, म्हणून तुला किती वेळां सांगायचं?—ताईकडे कां गेला होतास?—बरी वेळेवर आलीस ताई, मी बोलाऊंच पाठविणार होतें तुला. आज अश्विनी आहे ना? मधूला ओवाळायचं नाहीं का आज आपल्या?"

बोलतां बोलतां लीलाबाईना दम लागला. तेव्हां कांहीं तरी बोलावयाचें म्हणून शांता म्हणाली, "खरंच, विसरूनच गेलें होतें कीं मी अगदीं!"

" तयारी कर तूं ओवाळणीची, म्हणजे मी ओवाळीन म्हणतें तुम्हा दोघांना. " लीलाबाई उद्गारल्या. क्षणभरानें त्या मधूला म्हणाल्या, " जा बाळ, ताईच्या आईला बोलावून आण आधीं —"

शांता लगेच ओवाळणीच्या तयारीला लागली. तिनें लीलाबाईच्या अंथरुणाजवळच रांगोळी घालून पाट मांडला. इतक्यांत रमाबाई आल्या.

" माई, आज अश्विनी आहे ना?—या दोन्हीहि मुलांना आज मी एकदां शेवटचं ओवाळून घेतें!—आतां कांहीं फार दिवस जात नाहींत माझे!" बोलतां बोलतां लीलाबाईचे डोळे भरून आले.

" असं भरल्या घरांत अवेळीं अभद्र कां बोलतां लीलाताई? याच्यापेक्षां दुखण्याच्या आहारीं गेलेलीं माणसं मी उठतांना पाहिलीं आहेत. " रमाबाई कळवळून म्हणाल्या.

" हें आपलं उगीच मनाची समजूत घालण्यासाठीं बोलायचं, माई माझे किती दिवस जातील हें आतां दिसतंच आहे मला." लीलाबाईंनीं म्हटलें.

इतकें बोलून त्यांनीं शांताला मधूला मांडीवर घेऊन पाटावर बसावयाला सांगितलें. रमाबाईंच्या मदतीनें त्या अंथरुणावरच थोड्या पुढें सरकल्या. नीरांजन पेटवून ओवाळण्याचें तबक रमाबाईंनीं त्यांच्या हातीं दिलें. त्यांच्या डोळ्यांतून सारखे अश्रु येत होते व हातहि थरथरा कांपत होते. तरीहि त्यांनीं तबक हातांत धरून त्या दोघांना कसें तरी ओवाळलें. पण ते श्रम त्यांना फार झाले. रमाबाईंनीं त्यांच्या हातांतील तबक बाजूला ठेवून त्यांना हळूच अंथरुणावर निजविलें; व मधूला मांडीवर घेऊन त्या त्यांच्याजवळ बसल्या. दोघांहि मायलेकींच्या डोळ्यांतून अश्रु वहात होते. बिचारा मधु मात्र घाबरून जाऊन, एकदां त्या मायलेकींकडे, तर एकदां डोळे मिटून निपचित पडलेल्या आपल्या आईकडे पहात होता.

क्षणभरानें लीलाबाईंनीं डोळे उघडले. रमाबाईंचा हात त्यांनीं आपल्या हातीं घेतला. त्यांनीं एकदां मधुकडे आणि एकदां शांताकडे पाहिलें. त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा चालल्या होत्या. शेवटीं मनाचा कांहींतरी निश्चय करून त्या रमाबाईंना म्हणाल्या, " आतां फार तर आठ पंधरा दिवसांची सोबतीण

आहे मी माई. तुम्हीच माझ्या जागीं आहां या पुढं माझ्या मधूला. गेलीं तीन वर्षं मी या दोघांना ओंवाळलं; यापुढं तुम्ही ओवाळा त्यांना. तुम्ही अन् ताईनं आजवर मी असतांना जसं त्याचं केलं, तसंच यापुढें मी मेल्यावर—"

लीलाबाईच्यानें पुढें बोलवेना.

* * * *

पक्षिणीची सान बाळें । रक्षियेलीं दावानलीं
कुठें कणव ती गेली । दयाघना
कुंती माऊलीच्यासाठीं । मृत बाळ उठवील।
आम्हांवरी कां कोपलां । नारायणा
गोऱ्या कुंभाराचें बाळ । हांकेसरसें धांवलें
कुठें वात्सल्य तें गेलें । जगन्नाथा

मांडीवर डोकें ठेवून पडलेल्या मधूला थोपटीत शांता या ओंव्या घोळघोळून म्हणत होती. आधींच सकंप असलेला तिचा आवाज ओवीच्या प्रत्येक चरणागणिक अधिकाधिक सकंप होत होता. मधूचे डोळे मिटलेले होते ओंवीचा शेवटचा चरण संपला कीं शांता क्षणभर थांबत असे. त्याबरोबर मधूचे डोळे उघडत. तिनें त्याच्या अंगावरून हात फिरवित पुन्हा ओंवी म्हणावयाला आरंभ केला कीं पुन्हा त्याचे डोळे मिटत. पूर्वीचा तो अल्लड, आनंदी मधु आतां राहिला नव्हता. आई, आई,—आईचा मृत्यु मुलाच्या जीवनांत केवढी क्रांति घडवून आणतो! मरण म्हणजे काय याची सहा वर्षांच्या पोराला काय कल्पना असणार? पण, आईचें प्रेत घरांतून बाहेर पडलेलें पाहिल्यावर, आतां या घरांत आपलें असें कांहीं उरलेलें नाहीं, एवढी जाणीव मात्र मधूच्या अजाण मनाला झाली. पूर्वीचा तो खट्याळ, खेळकर मधु आतां तास न् तास कोंपऱ्यांत डोकें खुपसून घराच्या पायरीवर बसून राही. ताईच्या मांडीवर डोकें ठेवून शून्य मनानें पडून रहाणें, एवढेंच एक समाधान त्याला उरलें होतें.

माउलीची ताटातूट । तुम्हां आहे हो ठाऊकी
माय आठवा देवकी । यदुराया

माउलीच्या भेटीसाठीं । कोण केली तुम्ही घाई
त्याची करा स्मृती कांहीं । घननीळा
मायेसाठीं पांखरूं हें । जीव सारखें पांखडी
कैसि केली ताडातोडी । दीनानाथा

ओवीचा शेवटचा चरण संपतांच शांता थांबली. त्याबरोबर मधूनें डोळे उघडून विचारलें, " ताई, ताई, आपली आई भेटेल कां ग पुन्हा कधीं आपल्याला ? "

" हो, भेटेल बरं बाळ," शांता त्याच्या कुरळांनीं झांकलेल्या संतप्त कपाळावर हात फिरवीत म्हणाली.

" कधीं ग ? " मधूनें प्रश्न केला.

" आपण किनई देवाच्या घरीं गेलों, म्हणजे आपली आई भेटेल आपल्याला," शांतानें उत्तर दिलें.

" देवाच्या घरीं ? देवाचं घर कुठं आहे ? " मधूनें थोडें थांबून विचारलें. त्याच्या कपाळाला आंठ्या पडून डोळ्यांचा संकोच झाला होता.

" देव किनई खूप खूप दूर राहतो," शांतानें त्याला गप्प करण्याच्या हेतूनें म्हटलें.

" मग आपण आजच देवाकडे जायला कां निघूं नये ?" मधूनें आपले विचारपूर्ण डोळे तिच्याकडे लावून म्हटलें.

" असं बोलूं नये कांहींतरी मधू ! " शांता म्हणाली. तिचे डोळे पाण्यानें भरून येऊन दोन कढत अश्रु मधूच्या कपाळावर पडले.

मधूनें डोळे मिटले. चंद्र नुकताच क्षितिजावर आला होता.

\+ + + +

शांता गच्चीच्या कठड्यावर हात ठेवून शून्य दृष्टीनें समोर पहात होती. आपल्या उजव्या हाताच्या आरक्त तळव्यावर तिनें आपलें मनोहर मुखमंडल

टेंकलें होतें. तिच्या त्या विशाल नेत्रांत पूर्वी सदैव खेळणारा उल्हास नाहींसा होऊन, निराशेची खिन्न छाया त्यांत प्रतिबिंबित झाली होती. आपण काय पहात आहों आणि कसला विचार करीत आहों, याचें तिला भान नव्हतें. ती वेळच अशी होती कीं, अनुभवलेल्या सुखदुःखांच्या संमिश्र स्मृतींचें काहूर मनांत उठून मन पर्युत्सुक व्हावें. सूर्य मावळला होता. तथापि अद्याप पुरता अंधार पडला नव्हता; व पूर्वेकडील क्षितिजहि किंचित् उजळलें होतें. इतक्यांत अत्यंत करुण-पूर्ण असे गाण्याचे मंजुळ सूर शांताच्या कानांवर येऊन पडले. त्याबरोबर ती किंचित् दचकली; आपला पाठीवर झुकलेला पदर तिनें सावरला; व ते सूर ती लक्ष देऊन ऐकूं लागली.

पुनवेचा चंद्र । आला पूर्वेचिया दारा
कधीं येशी माझ्या घरा । भाऊराया
पुनवेचा चंद्र । उभा पूर्वेच्या अंगणीं
तुझी मूर्ती माझ्या मनीं । भाऊराया
पुनवेचा चंद्र । झाडाआडुनी हांसतो
माझ्या डोळियां दिसतो । भाऊराया
पुनवेच्या चंद्रा । सोन्यामोत्याचें औक्षण
तुझ्यासाठीं माझे प्राण । भाऊराया

ऐकतां ऐकतां शांताचे डोळे पाण्यानें भरून आले. इतका वेळ झाडा-आड लखलखत असलेलें चंद्राचें भव्य बिंब वर येऊन, त्याचे हंसरे किरण तिच्या उदास मुखावर पडले. त्याबरोबर तिनें आपले आंसवांनीं भरलेले डोळे वर केले आणि एक वेळ त्या पूर्णचंद्राकडे पाहिलें. अगदीं क्षणभर,—क्षणभरच तिला असें वाटलें कीं, मुक्तकंठानें रडावें. तोंच आपल्याला कोणीतरी हांक मारीत असल्याचा तिला भास झाला. लगेच तिनें आपले डोळे पुसले व गच्चीच्या पायऱ्या झरझर उतरून ती खालीं आली.

"ताई, अग ताई, किती हांका मारल्या ग तुला मी! एकटीच काय करीत होतीस गच्चीवर?"—हे आईचे शब्द ती माजघरांत येत असतां तिच्या कानांवर पडले.

शांतानें माजघरांत पाऊल ठेवलें मात्र,—तेथील दृश्य पहातांच तिनें एवढा वेळ आवरून धरलेल्या दुःखाचा आवेग वेगानें बाहेर पडला. तिनें आपले दोन्हीहि हात डोळ्यांवर ठेवले; येत असलेला हुंदका निग्रहानें आवरला; व अत्यंत उद्वेगपूर्ण, किंचित् कठोर अशा कांपऱ्या आवाजांत ती आईला म्हणाली, "कशाला केलीस तूं ही तयारी आई! अग, ज्याच्यासाठीं मी आजवर ओवाळून घेतलं, तो गेला. आतां कशाला ओवाळतेस मला! पाठचे तर नाहींच राहिले, पण मानलेल्याला देखील माझं घार्जिणं नाहीं ग! —"

तेव्हांपासून भाऊबिजेच्या दिवशीं मात्र शांता चंद्राला नेमानें ओवाळीत असते.

—यशवंत, फेब्रुवारी, १९२९



## आकर्षण

"आतां कशी काय दिसतें मी ? मघांचच्या पेक्षां अधिक मोहक नाहीं वाटत तुला ?"

सुषमेनें हातांतील ओष्ठशलाका (lipstick) खालीं ठेवून उत्कंठेनें मागें पहात इंग्रजींत विचारलें.

पण तिचा हिरमोड झाला.

विद्याधराचें लक्ष तिच्याकडे मुळींच नव्हतें. तो कोचाच्या कमानीवर डोकें टेंकून कसल्या तरी गाढ, गूढ विचारांत निमग्न झाला होता.

आपल्याविषयींची त्याची ती उपेक्षावृत्ति पाहून सुषमेला फार राग आला. पण त्या रागाची जाणीव त्याला देण्यांत अर्थ नाहीं, हें लगेच तिच्या लक्षांत आलें. म्हणून ती हळूच त्याच्याजवळ गेली; व अर्धवट त्याच्या अंगावर रेलून त्याला लाघवीपणानें म्हणाली—

" कसला विचार करतो आहेस विद्या तूं आज एवढा ? मी आरशासमोर उभी असल्यापासून पहातें आहे,—तूं आपला कसल्या तरी विचारांत चूर आहेस सारखा. मी जवळ असतांना तूं दुसऱ्या गोष्टीचा विचार करावास हें सहन नाहीं होत मला !—"

—बोलतां बोलतां तिनें आपलें तोंड चुंबनाच्या अपेक्षेनें त्याच्या तोंडाला भिडविलें

पण विद्याधरानें लगेच मान फिरविली.

त्याबरोबर सुषमा आर्जवानें त्याला म्हणाली, " नाहीं, नाहीं.—–विद्या, तोंड नको फिरवूंस तूं अशा रीतीनं.—–तूं यायचा असल्यामुळं आज सकाळपासून शिवलें नाहीं मी सिगारेटला !—–"

आणि ती त्याच्या अंगाला अधिकच बिलगली.

त्यानें तिच्या लोभनीय शरीराभोंवती आपले हात लपेटून उन्मादानें अर्धवट मिटलेल्या तिच्या डोळ्यांचें, केसांचें, कपाळाचें भराभर चुंबन घेतलें.

पण तिचें समाधान झालें नाहीं.

तिनें इंग्रजींत विचारलें, "तूं माझ्या ओठांचं चुंबन कां घेत नाहींस विद्या?"

"तुला माहित आहे सुमा मी कां घेत नाहीं तें!"

तिनें पदरानें ओठाला नुकताच लावलेला रंग पुसून टाकला व नंतर म्हटलें, "आतां तर हरकत नाहीं ना?"

आतुरतेनें अर्धवट उमललेल्या तिच्या ओष्ठकलिकेला त्यानें आपल्या ओठांनीं हळूच स्पर्श केला; व त्याच्या तोंडून अत्यंत आर्त उद्गार निघाला—

"सुमा!—"

"काय विद्या? अजूनसुद्धां कसला तरी विचार करतो आहेस तूं! मी इतकी तुझ्याजवळ आहे, पण मला सारखं वाटतंय कीं आपण एकमेकांपासून लाखों मैल दूर आहोंत! खरं सांग विद्या,—मी तुझ्याजवळ असतांना तूं कसला विचार करीत असतोस एवढा?

"पुनर्जन्माचा!—"

"पुनर्जन्माचा? अन् कुणाच्या तो?"

"आपल्या प्रेमाच्या पुनर्जन्माचा!"

"कां? त्यांत विचार करण्यासारखं काय आहे?"

"कां? त्यांत विचार करण्यासारखं काय नाहीं?—मीच तुला उलट विचारतों!—सहा महिन्यांपूर्वी तुझ्या स्वप्नांत तरी आलं होतं का आपण पुन्हा अशा रीतीनं एकत्र येऊं म्हणून?"

"हो!—न यायला काय झालं? आपला दोघांचा संबंध तुटल्यापासून गेल्या पांच वर्षांत माझ्या आयुष्यांतला एक क्षणहि असा गेला नाहीं, कीं ज्या क्षणीं मला तुझी आठवण झाली नसेल.—माझ्या सौंदर्यावर लुब्ध असलेल्या इतर तरुणांच्या सहवासांत मी जेव्हां नव्या नव्या सुखांचा आस्वाद घेत होतें, तेव्हां

त्या आत्मविस्मृतीच्या क्षणीं सुद्धां, विद्या, तुझी आठवण मला सारखी डिंवचीत असे, —माझ्या अंतर्मनाच्या तळघरांत पिशाचासारखी वावरत असे! आपण पुन्हा कधीं एकत्र येणार नाहीं, असं मला कधींच वाटलं नाहीं.—नव्हे, उलट मला सारखं असं वाटत होतं कीं, ज्या क्षणीं मी तुझ्या नांवाचा टाहो फोडीन, त्या क्षणीं तूं धांवत येशील माझ्याकडे! आणि तसंच नाहीं का घडलं अखेर?"

"होय.—घडलं खरं! त्या दिवशीं संध्याकाळीं थिएटरांत तुझी चिठी आली, तेव्हां विश्वास बसेना माझा स्वतःच्या डोळ्यांवर!—पण तें हस्ताक्षर पाहतांच तुझी मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें उभी राहिली न् मंत्रमूढ होऊन मी तुला भेटण्यासाठीं बाल्कनींत आलों! खरोखरीच तुझी एक प्रकारची सत्ता आहे माझ्या मनावर, मोहनी आहे माझ्या शरीरावर—"

"आणि तुझी नाहीं का रे मोहनी माझ्या मनावर, माझ्या शरीरावर?—"

"होय. मी नाहीं म्हणतों कां? त्या मोहनीमुळंच तर पांच वर्षांच्या वियोगानंतर, पांच वर्षांपूर्वीं झालेल्या विलक्षण भांडणानंतर, आपण पुन्हा एकत्र आलों. पण, आपल्याला एकमेकांविषयीं वाटणाऱ्या या आसक्तीचें मी पृथक्करण करूं लागलों, म्हणजे आपल्या प्रेमाचा हा पुनर्जन्म अनिष्ट वाटतो, निरर्थक वाटतो मला!"

"कां बरं? पूर्वींपेक्षां मी तुला कमी आवडतें का? माझ्या सहवासापासून तुला सुख कमी होतं कां?"

"तुझ्याविषयींची माझी आवड, आसक्ति कमी झालेली नाहीं, होणें शक्यहि नाहीं! पण सुख? कुणाला ठाऊक तुझ्यापासून मला सुख होतं कां असुख होतं तें?"

"असं का बोलतोस तूं विद्या? आपली ताटातूट झाल्यापासून गेल्या पांच वर्षांत मी ज्या पद्धतीनं आयुष्य घालविलं ती पद्धत, माझा सध्यांचा जीवनक्रम तुला पसंत नाहीं याची जाणीव आहे मला.—पण तुला न आवडणाऱ्या माझ्या कितीतरी संवई मी सोडल्या, सोडण्याचा सारखा प्रयत्न करतें आहे—"

" होय, खरं आहे तुझं म्हणणं. पण, सुमा, गेलीं पांच वर्षे तुझं आयुष्य ज्या पद्धतीनं गेलं त्यामुळं तुझ्यांत कांहीं फरक पडला नाहीं, तुझ्या मनोरचनेचं –जीविताचं स्वरूप कांहीं बदललं नाहीं असं वाटतं कां तुला?—तो पालट सारखा मला जाणवत असतो;–क्षणोक्षणीं मला सांगत असतो कीं, पांच वर्षांपूर्वी जिच्याशीं तूं विवाहबद्ध व्हायला उत्सुक झाला होतास ती सुषमा ही नव्हे;—ही दुसरीच कोणी तरी स्त्री आहे. त्या स्त्रीच्या आंतर जीवनाचा न् तुझ्या आंतर जीवनाचा कांहींहि संबंध नाहीं.–आपण ज्या वेळीं एकमेकांविषयींच्या आसक्तीनं उन्मत्त आणि एकजीव झालेलों असतों, तेव्हांसुद्धां ही कल्पना जात नाहीं माझ्या मनांतून—"

" दुसरी स्त्री ! होय, खरंच आहे तुझं म्हणणं ! पण कधीं नव्हतें मी दुसरी स्त्री ? फक्त तूं मला ओळखलं नाहींस त्या वेळीं एवढंच !—"

—बोलतां बोलतां सुषमा झटकन त्याच्या जवळून उठून टेबलापाशीं गेली. पाश्चात्य नटींप्रमाणें तिनें आपल्या साऱ्या केंसांना कातर लावली नव्हती; तर फक्त कानांच्या जवळचे केंस अशा रीतीनें कापले होते कीं, कधींच तेल न लावल्यामुळें पिंगट पण सतेज दिसणारीं त्यांचीं कुरळीं झुलपें तिच्या प्रत्येक हालचालीगणिक अतिशय मोहक रीतीनें हलत असत. टेबलावरील डब्यांतली एक सिगारेट तिनें काढली; व ती पेटवून घाईघाईनें तिचे तीन चार झुरके घेतले. तिचें तें धूम्रपान पाहून विद्याधराच्या कपाळाला पडलेल्या आंठ्या तिच्या लक्षांत आल्या कीं नाहीं, कोण जाणे ! कारण आपल्या किंचित् उंचावलेल्या, स्फुरणशील, नाजूक नाकपुड्यांतून बाहेर पडणाऱ्या सुवासिक धुराच्या वलयांकडे पहात ती, अर्धवट स्वतःशींच बोलावें त्याप्रमाणें, एक प्रकारच्या बेपर्वाईनें उद्गारली—

" प्रेम ! प्रेम !–प्रेम म्हणजे काय एका माणसाचं व्यक्तित्व दुसऱ्या माणसाच्या व्यक्तित्वांत विलीन होऊन जाणं कां ? स्त्री म्हणजे काय मिठाचा खडा किंवा मातीचं ढेंकूळ आहे, कीं एखाद्या पुरुषावर तिचं प्रेम जडतांच त्याच्या जीवनांत तिचं व्यक्तित्व विरघळून, नाहींसं होऊन जावं ? तो

मिठाचा खडा किंवा तें मातीचं ढेकूळ पाण्याची रुचि न् रंग थोडा तरी बदलतं. पण ज्याच्यावर स्त्रीचं प्रेम बसलेलं असतं तो पुरुष !—त्याच्या जीवनांत कांहींच का बदल होऊं नये तिच्या व्यक्तित्वाच्या प्रभावानं ? तिचं व्यक्तित्व थोडंसुद्धां शिल्लक राहिलेलं सहन होऊं नये का त्याला ?—विद्या, आठवण कर तूं,—कॉलेजांत पहिल्या वर्षी आपली ओळख झाल्यापासून तों पुढें पांच वर्षांनीं ताटातूट होइपर्यंत आपलं आयुष्य कशा रीतीनं गेलं याची ! आपल्या एकमेकांवरील प्रेमाचं काव्य कॉलेजांत ज्या वेळीं प्रत्येक विद्यार्थ्याच्या तोंडीं खेळत होतं, त्या वेळींसुद्धां भांडणाशिवाय एक दिवस सुना गेला नाहीं आपला !—आपलीं मतं, आपले स्वभाव, आपली अभिरुची यांच्यांत कांहीं कांहींसुद्धां मेळ नव्हता.—ही गोष्ट जर तूं त्या वेळीं ओळखली असतीस, तर मी सिनेमांत जायचं ठरवल्याबरोबर तूं आपलं निश्चित झालेलं लग्न मोडलं नसतंस, माझ्यावर नाहीं नाहीं ते आरोप करून माझ्याशीं संबंध तोडला नसतास !—आणि आज तूं एकादा नवीन शोध लावल्यासारखं मला सांगतोस,—" तूं अगदीं दुसरीच स्त्री वाटतेस मला ! "—त्या वेळीं ज्या स्त्रीवर तूं प्रेम केलंस, तीच स्त्री मी आजहि आहें. फार तर परिस्थितीमुळं माझ्या बाह्य जीवनांत काय फरक पडला असेल तेवढाच—"

" होय, तुझ्या म्हणण्यांत तथ्य आहे सुमा ! आपल्या मतांतला, स्वभावांतला, अभिरुचींतला विरोध मला तेव्हां जाणवत नव्हता असं नाहीं. त्या विरोधामुळंच आपल्याला एकमेकांविषयीं आकर्षण वाटलं इतकं—"

" नाहीं. इथंसुद्धां चुकतंय पुन्हा तुझं !—आपल्यामधलं आकर्षण वाढायला तो विरोध पोषक झाला असेल कदाचित्. पण आपल्याला एकमेकांविषयीं इतकं आकर्षण वाटण्याचं खरं कारण निराळं आहे अगदीं. "

" कोणतं कारण ?—मघाशीं माझ्यावर शोध लावल्याचा आरोप केलास तूं ! आतां तुझा हा शोध ऐकूं दे मला—"

" माझा शोध नाहीं हा विद्या ! तूं एवढा बुद्धिमान्, तर्ककुशल, आपल्या प्रेमाच्या पुनर्जन्माविषयीं सारखा विचार करीत असलेला !—पण त्या प्रेमाचीं कारणं समजून घेण्याचा मात्र प्रयत्न नाहीं केलास तूं कधीं !—

आपण दोघं एकत्र आलों, तीं सौंदर्यविषयींच्या आपल्या विशिष्ट कल्पनां-मुळं. पुष्कळदां असं होतं कीं, एकाद्या माणसाचे विचार, त्याचं वर्तन आपल्याला आवडत नाहीं. पण त्याचं रूप, त्याचं व्यक्तित्व, त्याच्या डोळ्यांतून जगाकडे बघणारी त्याची बुद्धिमत्ता यांची छाप पडते आपल्या मनावर. तसंच झालं आपलं. स्त्रीसौंदर्याविषयींच्या, स्त्रीच्या व्यक्तित्वाविषयींच्या तुझ्या कल्पनांना जुळतील अशा बऱ्याचशा गोष्टी तुला माझ्या ठिकाणीं आढळल्या, म्हणून तूं माझ्याकडे ओढला गेलास. तूं स्वतःच किती तरी वेळां हें बोलून दाखवलं आहेस मला—"

"म्हणजे काय तुला असं म्हणायचं आहे कां कीं तुझ्याविषयीं केवळ एक प्रकारचं शारीरिक आकर्षण वाटल्यामुळं मी तुझ्यावर प्रेम करूं लागलों?"

"तसंच केवळ नव्हे. आणि, समजा, जरी कदाचित् तसं असलं तरी राग मानण्यासारखं गैर काय आहे एवढं त्यांत? प्रेमाविषयींच्या आपल्या साऱ्या उच्च न् अमूर्त कल्पना शेवटीं शरीरालाच येऊन भिडतात न् सफल होतात कीं नाहीं?—पण तुला माझ्याविषयीं जें आकर्षण वाटलं, तें नुसतं शारीरिक नव्हतं विद्या. एकदां रुस्तुमनं विचारलं होतं तुझ्याविषयीं मला,—"तो विद्याधर वकील इतका रुक्ष न् एकमार्गी असतां तुझं त्याच्यासारख्या माणसावर इतकं प्रेम कसं जडलं सुमा?" तेव्हां मी त्याला जें उत्तर दिलं, तेंच तुझ्याहि माझ्याविषयींच्या प्रेमाला लागू पडतं—"

"काय सांगितलंस तूं त्याला?"

सुषमेनें सिगारेटचें हातांतलें थोटूक फेंकून दिलें; व दुसरी सिगारेट पेटवीत त्याला म्हटलें, "मी त्याला सांगितलं,—"पुरुषाच्या सौंदर्याविषयीं माझ्या कांहीं कल्पना आहेत. त्या कल्पना नुसत्या शारीरिक नाहींत, बौद्धिकहि आहेत. त्या कल्पनांचं प्रतीक म्हणून मला आवडतो विद्याधर! तो रुक्ष असेल, कायदेपांडित्यापलिकडे दुसऱ्या कोणत्याहि गोष्टींत त्याला गम्य नसेल. पण तरीहि माझं कलासक्त मन त्याच्याकडे ओढ घेतं. कदाचित त्याच्या त्या रुक्षपणांतच कांहीं तरी मोहिनी असेल. आकाश फाडून आंत घुसणारा पर्वताचा

उंच बेलाग सुळका आपल्याला कां आवडतो? जुहूच्या वाळवंटांतलं फक्त चांदण्याचंच तेवढं दृश्य आपल्याला आवडतं का? वाऱ्यानं डोलणाऱ्या माडांच्या झांवळ्यांतून पसरलेला काळोख न् त्या माडांच्या गर्द रांगांमागून ऐकूं येणारी समुद्राच्या भरतीची गर्जना हीसुद्धां मनाला एक निराळ्याच प्रकारचा आनंद देत नाहीं का? तसंच कदाचित् असेल हें—"

"पण सुमा, तूं रुस्तुमशीं लग्न करणार असं ऐकलं होतं मी गेल्या वर्षी–"

"होय. लोकांना तसं वाटण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली होती खरी. तो सदोदित माझ्या मागें मागें, मी जाईन तिथं माझ्या बरोबर असायचा. खरोखर विद्या, गेल्या पांच वर्षांत पुष्कळ पुरुषांचा सहवास घडला मला. पण रुस्तुमइतका प्रणयक्रीडेंत चतुर असलेला तरुण मी पाहिला नाहीं दुसरा! आणि तो सुंदर तरी किती आहे!–"

"मग तूं कां नाहीं केलंस लग्न त्याच्याशीं?"

"लग्न?—त्याच्याशीं लग्न करण्याची कल्पना कधींच माझ्या मनांत आली नाहीं!—"

—बोलतां बोलतां ती सिगारेटचा एक झुरका घेऊन किंचित् थांबली. आपण रुस्तुमविषयीं जें बोललों त्यामुळें विद्याधर चिडल्यासारखा झाला आहे, हें तिच्या लक्षांत आलें; व त्याला जास्त डिंवचावा म्हणूनच कीं काय, ती पुन्हा एक झुरका घेऊन त्याच्याकडे संथपणानें पहात म्हणाली—

—"पण आपल्याला प्रिय असलेल्या पुरुषाला स्त्री जें कांहीं देऊं शकेल, तें सारं मी रुस्तुमला दिलं आहे!–"

"सुमा!—"

"होय, मी अगदीं खरं खरं सांगतें आहे तुला. माझ्यासारख्या सुशिक्षित स्त्रियांचा हा दृष्टिकोन तुम्हां पुरुषांना कां समजूं नये, कळत नाहीं मला! मी असे पुष्कळ पुरुष पाहिले आहेत कीं, ज्यांचं एकाद्या स्त्रीवर अत्यंत प्रेम असतं; तिच्याविषयीं त्यांना कमालीची आसक्ति वाटत असते; तिच्या सहवासांत ते दिवसच्या दिवस मजेनं घालवितात!—पण लग्नाच्या बंधनानं मात्र

स्वतःला तिच्याशीं जखडून घ्यायला ते तयार व्हायचे नाहींत कधीं. ती स्त्री फक्त त्यांना प्रिया, मैत्रीण, सहचरी म्हणून हवी असते; पत्नी म्हणून नव्हे. या त्यांच्या वृत्तीबद्दल मी तरी त्यांना दोष देणार नाहीं. कारण एकादी व्यक्ती आपल्याला प्रिय व्हायला, तिच्याविषयीं आसक्ति वाटायला, तिचं साहचर्य आवडायला जे लोभनीय गुण अवश्य असतात, ते विवाहित आयुष्य, संसार यशस्वी करायला उपयोगी पडतातच असं नाहीं. संसार, विवाहित आयुष्य सुखी न् सफल व्हायला स्थैर्य, मनोभावनांचं एक प्रकारचं गांभीर्य अवश्य असतं.— Hopelessly settled असं जें विवाहितांच्या आयुष्याला येणाऱ्या स्थैर्याचं वर्णन शॉनं केलंय तें उगाच नव्हे !— "

" ढोंगी आहे तुझा तो शॉ ! स्वतःच्या वैवाहिक आयुष्याची निसटती छटासुद्धां ज्यानं कधीं जगाला दिसूं दिली नाहीं, त्या शॉचे या विषयावरले विचार कशाला ऐकवतेस तूं मला सुमा ?—तुझा न् रुस्तुमचा संबंध —"

"—तोच तुला समजावून सांगण्याचा प्रयत्न करत्येय मी !—काय बोलत होतें बरं मी ?—होय ! स्त्रीपुरुषांच्या साहचर्याचा सारा आनंद प्रेमाच्या तरलतेंत, त्या तरलतेचा अनिर्बंध उपभोग घेण्यांत आहे. प्रेमाचं अमरत्व ही कविकल्पना आहे निव्वळ एक. प्रेम हें फुलपांखरासारखं असतं. त्याला कुठंच कायमचं घर करून रहायला आवडत नाहीं, आवडणं शक्य नाहीं. प्रेम आणि जीवन ! किती जणांना या शब्दांचा अर्थ कळला आहे कुणाला ठाऊक ! जीवनाची सारी मजा, सारी जादू तें चंचल, प्रवाही, सैराट असण्यांत आहे ?— स्त्रीला एकादा पुरुष प्रिय वाटला, म्हणून काय लगेच तिनं त्याच्याशीं लग्न करून त्यांच्या गळ्यांतलं जोखड होऊन कां बसलं पाहिजे ?—"

" मग रुस्तुम तुझा प्रियकर होता म्हणायचा तर ? "

" होय. खरंच आहे तुझं म्हणणं एका परीनं ! जुहूला, पारसीकला, माथेरानला, महाबळेश्वरला मी कितिदां तरी सारी रात्र त्याच्याबरोबर गप्पा मारण्यांत, हिंडण्यांत, खेळण्यांत, नांचण्यांत घालविली आहे. माथेरानचाच प्रसंग

तो मला वाटतं !—त्या रात्रीं त्यानं मद्य थोडं जास्त घेतलं होतं; न् नंतर नाचतां नाचतां तो मला म्हणाला, त्यानं मला सुचवलं,-पण मी कबूल नाहीं झालें त्या गोष्टीला. मात्र त्याच्या त्या सुचविण्याचा राग नाहीं आला मला.—आम्ही दोघंहि बेहोष झालों होतों नुसतीं !—पण मी त्याला स्पष्टच सांगितलं, "रुस्तुम, माझं हृदय मी विद्याधराला देऊन टाकलं आहे!" खरोखर विद्या, तुझ्या खालोखाल जर जगांतल्या दुसऱ्या कोणत्या पुरुषावर मी प्रेम केलेलं असेन, तर तें रुस्तुमवर !—पण तुझ्याविषयीं जें आकर्षण मला वाटतं, तें मात्र त्याच्याविषयीं कधींहि वाटलं नाहीं.—मला वाटत नाहीं, दुसऱ्या कोणत्या पुरुषाविषयीं असं आकर्षण मला कधीं वाटेल म्हणून ! आणि मला जसं हें आकर्षण तुझ्याविषयीं वाटतं, तसंच तुलाहि माझ्याविषयीं वाटतं. तें आकर्षण निव्वळ शारीरिक नाहीं, निव्वळ बौद्धिकहि नाहीं.—शरीर आणि बुद्धि या दोहोंनाहि ओढ लावणारी जादू त्या आकर्षणांत आहे —"

बोलतां बोलतां ती थांबली. तिच्या हातांतली सिगारेट विझली होती.

खोलींत झपाट्यानें काळोख पडत चालला होता.

म्हणून विद्याधरानें उठून दिवा लावला.

दिव्याचा प्रकाश अंगावर पडतांच सुषमा दचकली व तिनें भानावर येऊन विद्याधराकडे बघितलें.

—तो तिच्याकडे निश्चल नजरेनें पहात होता.

विद्युद्दीपाचा उज्ज्वल प्रकाश तिच्या अंगावर पडून तिच्या अनावृत अवयवांतून कांति जणूं ओसंडत होती.

आणि त्याच्याकडे पहातांना किंचित् तिरप्या झालेल्या तिच्या मानेवर उठलेले घर्मबिंदु केतकीच्या नितळ पानावर चमकणाऱ्या दंवबिंदूंच्या रेषेसारखे दिसत होते.

विद्याधराला वाटलें, तिच्या त्या पीतगौर मानेचें, त्या निमुळत्या चंचल नेत्रांच्या कडांचें चुंबन घ्यावें.

तो तिच्याजवळ जाऊन म्हणाला, " तूं म्हणतेस तें खरं आहे सुमा. तुझ्या रूपांत, डोळ्यांत, बुद्धींत, हालचालींत जो मोहक चंचलपणा भरलेला आहे, त्यामुळंच तूं आवडतेस इतकी मला. तुझ्याविषयीं मला वाटणारं हें आकर्षण कधींहि नाहींसं व्हायचं नाहीं. त्या आकर्षणानंच पांच वर्षांनंतर आपल्याला पुन्हा एकत्र आणलं. तरीसुद्धां तुझ्या सहवासांत मला पूर्वीसारखा आनंद वाटत नाहीं आतां—"

" तुला सारखं वाटत असतं,—ही तोंड रंगवते, धूम्रपान करते, केव्हां केव्हां मद्यसुद्धां घेते, वाटेल त्या पुरुषाबरोबर हिंडते फिरते!—माझ्या या स्वैर जीवनक्रमामुळं केव्हां केव्हां अविश्वास वाटत असेल तुला माझा नाहीं का? पण माझ्या या स्वैरतेमुळें, या चंचलपणामुळेंच तुला मी आवडतें ना? कल्पना कर, सांप्रदायिक नीतिबंधनांनीं जखडलेल्या इतर तरुणींसारखं माझं आयुष्य जर निर्लेप, बेचव असतं, तर तुला आवडलें असतें का मी? तुझ्या शरीराला न् बुद्धीला नवनव्या संवेदना देण्याची जी शक्ति माझ्या ठिकाणीं आहे, त्यामुळंच तुला मोह पडतो ना माझ्याविषयीं?—"

" होय.—तूं मदिरा आहेस एक प्रकारची. कांहीं काळ उत्तेजक, पण शेवटीं थकवा आणणारी! पूर्वी तुझ्यांतला चंचलपणा इतका अतिरेकाला गेला नव्हता. आतां मला असं वाटतं, तुझ्यांतले इतर सारे गुण लोपून गेले न् चांचल्य—अगदीं अवखळ, बेछूट असं चांचल्य तेवढं शिल्लक राहिलं आहे! —म्हणूनच मला वाटतं जिच्यावर मी पूर्वी प्रेम केलं ती स्त्री तूं नव्हेस—"

" असं नाहीं तुला वाटत!—तूं मला फसवायला पाहातोस भलतेच शब्द वापरून; स्वतःलाहि कदाचित् फसवित असशील! तुला खरोखरी काय वाटतं तें सांगतें मी.—सांप्रदायिक नीतिबंधनांनीं जखडलेल्या तुझ्या मनाला असं वाटतं कीं, जिच्यावर आपण प्रेम केलं, करतों आहोंत, त्या या स्त्रीचा आयुष्यक्रम किती विचित्र आहे! —या शंकेनं पावलोंपावलीं व्याकुळ होतं तुझं मन.—पण विद्या, मी आहे ही अशी आहे. माझा आग्रह नाहीं मुळींच—!

तुला वाटल्यास तूं माझा स्वीकार कर. गेलीं पांच वर्षें मी तुझ्या आशेनं अनेक लक्ष्मीपुत्रांना लाथाडलं;—मला आवडणाऱ्या रुस्तुमच्याहि प्रेमाचा अव्हेर केला. माझं मन मला सारखं सांगतं आहे विद्या माझा आहे,– केव्हां तरी आम्हीं एकत्र येऊं न् सुखी होऊं. तें स्वप्न खरं करणं न करणं तुझ्यावर अवलंबून आहे—"

तिनें बोलतां बोलतां त्याच्या मानेभोंवतीं आपल्या हातांचा विळखा घातला.

तिच्या धूम्रवासित ओठांना विद्याधराच्या ओठांचा स्पर्श झाला, त्याचे हात तिच्या शरीराभोंवतीं लपेटले.

जणुं कांहीं सागर आपल्या अनंत ऊर्मींनीं कामरूपिणी पृथ्वीला हृदयाशीं धरण्याचा प्रयत्न करीत होता.

—सत्यकथा, जुलै १९३६

## अजिंक्य

" नमस्कार मंडळी ! "

ते शद्व कानावर पडतांच बराकीच्या ओंवरींत सूत कातीत बसलेल्या साऱ्या बंदींनीं एकदम मागें वळून पाहिलें. तोंच वॉर्डरच्या पाठीमागून झपाझप पाऊलें टाकीत येत असलेली बापूजींची अधोवदन मूर्ति त्यांच्या दृष्टीस पडली. खादीचें किंचित् मळकट धोतर व त्याच धर्तीचें भरभरीत उपरणें एवढेच कपडे त्यांच्या अंगावर होते. त्यांचें मस्तक कधीं न उकललेल्या पिंगट जटांनीं झांकलेलें होतें. आणि दाढी त्या पांढुरक्या उपरण्यावर रुळत होती. कललेल्या सूर्याचे किरण ओझरते अंगावर पडल्यामुळें त्यांच्या जटांतील तुरळक पांढरे केंस चकाकून आपलें अस्तित्व दाखवीत होते. त्यांच्या करड्या, दाट भुंवयांखालीं दडलेले त्यांचे बारीक पिंगट डोळे, ज्यांच्या कडाकडांनीं राखेचा थर जमूं लागला आहे, अशा मंदावलेल्या निखाऱ्यांसारखे दिसत होते.

ओंवरीजवळ येतांच बापूजींनीं थबकून वॉर्डरला हिंदींत विचारलें, " काय रे बाबा, या मंडळीशीं चार शब्द बोलायला परवानगी आहे तुझी ?— अजून किती लांब आहे कोठडी माझी ? "

" हां, बोला ना आपल्याला काय बोलायचं आहे तें.—या पलिकडल्या गुन्हाखान्यांतच जायचं आहे आपल्याला ! " वॉर्डरनें किंचित् नम्रतेनें म्हटलें.

तोंच ओंवरीवर बसलेले एक वृद्ध बंदी उद्गारले, " केव्हां आलांत भंडाऱ्याहून बापूजी तुम्ही ? आमची कल्पना नव्हती तुम्ही इथं याल म्हणून !"

" आणि माझी तरी कुठं होती ? पण माझा योगच असा दिसतोय कीं, मी कुठंहि पकडलों गेलों, तरी शिक्षा भोगायला मात्र इथं यावं.—बाकी राजधानीच्या तुरुंगांतला पाहुणचार मिळायला सुद्धां नशीब लागतं ! "

ते आणखी कांहीं बोलणार, तोंच वॉर्डरच्या कंबरेला असलेला किल्ल्यांचा झुबका वाजला. त्याबरोबर ते एकदम त्याच्याकडे वळून म्हणाले, " हं, चल रे बाबा !— तुला इथं तिष्ठत ठेवून कसं चालेल ? आम्हीं एकदां कोठडी पाहून घेतों आमची;—मग आहेतच रोज गप्पा आपल्या !"

बापूजी थोडे दूर जातांच ते वृद्ध बंदी उद्गारले, " वायां गेला बिचारा अगदीं ! चांगला एलूएल्. बी. होऊन कौन्सिलपर्यंत एका काळीं गेलेला माणूस ! पण या गांधीच्या तत्त्वज्ञानाच्या तावडींत सांपडल्यापासून नुसत्या वाऱ्या करतोय तुरुंगाच्या ! वीस सालापासून चवथी खेप असेल याची ही !—"

" मग आप्पाजी तुम्ही कशाला आलांत इथं ? " भंडाऱ्याच्या एका तरुण बंदीनें खवचटपणानें विचारलें.

" आलों झालं लाटेंत सांपडून ! '

" अस्सं !—पण लाटेंत सांपडलेल्या लाकडाच्या ओंडक्यासारखे वहात आलां आहांत तुम्ही नुसते ! तुमचं अंतरंग अगदीं कोरडं राह्यलंय ठणठणीत ! आतां उद्यांपासून आयुष्यक्रम पहा बापूजींचा,— म्हणजे कळेल तुम्हांला त्यांच्या वागणुकीचं मर्म !—"

संध्याकाळीं पांच वाजतां बापूजी सायंस्नानाकारितां टाक्यावर आले तेवढेच. त्यानंतर पुन्हा कांहीं ते आपल्या एकांत कोठडींतून बाहेर पडले नाहींत. सातच्या सुमारास बंदींसाठीं दूध आलें. पण, बापूजींच्या आगमनाची रीतसर नोंद झालेली नसल्यामुळेंच बहुधा, त्यांच्या वाटचें अदपाव दूध कांहीं आलें नव्हतें.

म्हणून भंडाऱ्याच्या त्या तरुण बंदीनें आपल्या वाटचें दूध बापूजींच्या कोठडींत जाऊन त्यांना देऊं केलें. तेव्हां बापूजी हंसत हसत त्याला म्हणाले, " आज प्रवासानंतर अनशनच चांगलं नव्हे का ? "

दुसऱ्या दिवशीं पहांटे साडे पांच वाजतां कोठडीचें कुलूप उघडलें जातांच, बापूजींचा आयुष्यक्रम सुरू झाला. डिसेंबरच्या त्या कडक थंडींत

टाक्याच्या गार पाण्यांत स्नान करून ते आपल्या कोठडींत आले. त्यानंतर दुपारीं अकरा वाजेपर्यंत त्यांचें दर्शन घडलें नाहीं कोणाला. त्यांना साध्या कैदेची शिक्षा होती. त्यामुळें कामावर हजर होण्याची निकड त्यांच्या मागें नव्हती; व त्यांचे सर्व व्यवहार संथपणानें चालले होते. टाक्यावर स्नानासाठीं जमलेल्या इतर बंदींची धांवपळ पाहून ते म्हणाले, "आज फेरी आहे वाटतं सुपरिंटेंडंटसाहेबांची ! त्यामुळें तरी शिस्त राहिली आहे तुमच्या वर्तनांत थोडीशी —"

आठच्या आंत स्नानें, न्याहारी वगैरे आटोपून सक्तमजुरीचे सारे कैदी बराकीच्या ओवरींत येऊन बसले. प्रत्येकाच्या हातांतलि टकली गरगर फिरत होती; व खालच्या आवाजांत गप्पाही हळुहळू चालल्या होत्या. बरोबर साडे आठच्या ठोक्याला आवाराचा लोखंडी दरवाजा उघडला जाऊन सुपरिंटेंडंटसाहेब आंत आले. त्यांच्यामागें जेलर आणि डॉक्टर होते; व पुढें कांहीं अंतरावर वॉर्डर अदबीनें जणु कांहीं 'इत इतो देव' करीत चालला होता.

ओवरीसमोर आल्यावर साहेब किंचित् थबकून म्हणाले, "गुड मॉर्निंग जंटलमेन——"

त्याबरोबर बंदींनींहि उलट त्यांना त्याच शब्दांचा अहेर केला.

नंतर त्यांनीं आवाराकडे एकवार दृष्टिक्षेप करून इंग्रजींत विचारलें, "कुणाची कांहीं तक्रार, कांहीं मागणी ?"

पण कोणीच कांहीं बोललें नाहीं. तेव्हां साहेबांची मिरवणूक पुढें चालू झाली.

गुन्हाखान्याचें दार उघडेंच होतें. त्यांतून मिरवणूक आंत जातांच भंडाऱ्याचा तो तरुण बंदी उद्गारला, "आतां बापूजींची न् यांची कशी काय सलामी झडते पहावी !"

आणि हातांतली टकली टाकून तो उठलाहि लगेच.

क वर्गांतील गुन्हाखान्याइतका हा गुन्हाखाना भयानक नव्हता. ब वर्गांतील ज्या राजबंदींना इतर बंदींबरोबर एकत्र राहूं देणें धोक्याचें आहे असें अधिकाऱ्यांना वाटत असे, त्यांची खास व्यवस्था या गुन्हाखान्यांत केलेली होती. गुन्हाखान्याच्या आवाराची तपासणी सुपरिंटेंडंटसाहेब करीत असतांना तो तरुण हळूच आपल्या कोठडींत गेला; व आपलें अस्ताव्यस्त पडलेलें सामान लावीत असल्याचा बहाणा करीत उभा राहिला.

पाऊस नुकताच पडून गेलेला असल्यामुळें त्या भकास आवारांत कुठें कुठें हरळी उगवून करड्या जमिनीला किंचित् मार्दव आलें होतें. सुपरिंटेंडंट-साहेबांच्या तीक्ष्ण नजरेंत ती हरळी खुपली; व ती वेळींच काढून न टाकल्याबद्दल वॉर्डरवर ताशेरा झाडीत ते गुन्हाखान्याच्या पडवींत आले. तों तिथें त्यांना गवताच्या काड्या, सुतळीचे पिंजलेले धागे, बारीकसारीक पिसें वगैरे कचरा पडलेला आढळला. त्याबरोबर त्यांनीं वर नजर करून रागानें वॉर्डरला हिंदींत म्हटलें, “इथं हें पक्ष्यांचं घरटं कसं होऊं दिलं तुम्ही ! हा काय तुरुंग आहे का हें झाड आहे वडाचं !—”

आणि, त्यांनीं आपल्या हातांतील वेताची छडी इतक्या जोरानें हलविली कीं, त्या घरट्यांत अंडीं उबवीत बसलेली भोवऱ्याची मादी घाबरून भर्रदिशीं बाहेर उडाली. तें घरटें ताबडतोब काढून टाकण्याबद्दल ताकीद देऊन साहेब कोठड्यांची तपासणी करण्याच्या कामाला लागले.

बापूजींच्या कोठडीजवळ सुपरिंटेंडंटसाहेब आले, तेव्हां त्यांच्या कोठडीचें दार सताड उघडें होतें. पण आंत कोणी असल्याचें कांहींसुद्धां चिन्ह त्यांना दिसेना. म्हणून ते दाराच्या अगदीं जवळ आले; व त्यांनीं दारवंटावर लावलेली कैद्याच्या नांवाची चिठी न्याहाळून पाहिली. त्या चिठीवर इंग्रजींत लिहिलेलें होतें—

—रघुनाथ रामचंद्र

तें नांव पहातांच साहेब विजेचा झटका बसल्यासारखे होऊन एकदम मागें सरले.

"बाहेर बोलावूं का त्यांना!" जेलरनें विचारलें.

"आंत आहेत ते!—कांहीं जरूर नाहीं त्यांना बोलावण्याची!"

आणि लगेच ते पुढें चालावयाला लागले.

त्यानंतर दोन तासांनीं, आपलें आन्हिक आटोपल्यावर, दहाच्या सुमारास बापूजी बाहेर आले. तो भंडाऱ्याचा तरुण पडवींत एका खांबाला टेकून वाचीत उभा होता. त्याला पाहतांच बापूजींनीं हंसत हंसत विचारलें, "कां हो, मग आज सुपरिंटेंडंट येऊन गेले कीं नाहीं?"

"हो.—आपल्या कोठडीजवळ तर तब्बल पांच मिनिटं उभे होते साहेब!"

"होय.—आमचा ऋणानुबंध आहेच तसा!"

"पण आपण कांहीं बाहेर नाहीं आलां?—"

"मी ध्यानस्थ असेन त्या वेळीं! पुढच्या राऊंडला येईल दर्शनाचा योग!"

आणि ते हंसून कमंडलू भरण्यासाठीं टांक्यावर गेले.

त्यानंतर तीन दिवसांची गोष्ट. त्या दिवशीं शनिवार असल्यामुळें दुपारीं सर्व बंदींचें वजन करण्यांत आलें. त्या वेळीं बापूजींचें वजन तीन पौंड कमी भरलें. त्याबरोबर वजन करण्यासाठीं आलेला डॉक्टर त्यांना म्हणाला, "मला पेशी करावी लागेल याची—"

बापूजी हंसून म्हणाले, "काय पेशी करणार तुम्ही? मी कांहीं आजारी नाहीं—"

"होय. पण आपण अन्न घेत नाहीं त्याचा परिणाम आहे हा—"

"पण माझी कुठं तक्रार आहे त्याबद्दल?"

"तथापि माझं कर्तव्य मला केलंच पाहिजे."

"ठीक; तुमचं कर्तव्य तुम्ही करा, माझं मी करीत राहीन."

बापूजींनीं आपल्याला आवश्यक असलेल्या वस्तूंची सुपरिंटेंडंटकडे मागणी करावी, म्हणून गेले तीन दिवस सारे बंदी त्यांना सारखा आग्रह करीत

होते; व कांहींनीं तर आपल्या वाटचें दोन्ही वेळचें दूधहि त्यांना देऊं केलें. पण ते हंसून त्यांच्या साऱ्या बोलण्याला नकार देत.

डॉक्टर गेल्यावर तो तरुण राजबंदी त्यांना म्हणाला, " बापूजी, तुम्ही किती दिवस या दीडपाव दुधावर रहाणार ? उद्यां राऊंडच्या वेळीं सुपीरिंटेंडंट-साहेबांनीं तुम्हांला प्रश्न विचारला, म्हणजे सरळ मागणी करा फळांची त्यांच्याजवळ ."

" मला हसूं येतं तुमच्या या बोलण्याचं.–मी व्रतस्थ आहें. यदृच्छेनं जें कांहीं मिळेल त्यावरच निर्वाह केला पाहिजे मला. शिवाय माझं वजन घटलं, तरी परिणाम व्हायचा नाहीं माझ्यावर फारसा त्याचा. आपल्या पिंडाचं असं आहे कीं, परिस्थितीप्रमाणं मिळेल त्याच्यावर स्वतःचं पोषण करायला शिकतो तो—"

" मग निदान दूध तरी घेत जा तुम्हीं आमच्या वाटचं—"

" पण स्तेय नाहीं का होणार तें ! "

" आम्हीं नाहीं का तुमच्यासाठीं येणारा शिधा वापरून स्तेय करीत पर्यायानं ! "

" नाहीं.–तुम्ही माझ्या वाटच्या शिध्याचा उपयोग तुम्हांला आवश्यक म्हणून थोडाच करतां ! पण मी अन्न घेऊं शकत नसल्यामुळं तुम्ही मला आपलं दूध मुद्दाम देणं व मी तें घेणं हा मात्र परिग्रह आहे;–सूक्ष्म दृष्टीनं बोलायचं म्हणजे तें स्तेय आहे. आणि माझ्यासारख्या व्रतस्थाला या दोन्ही गोष्टी करणं योग्य होणार नाहीं—"

" विचित्र आहे हें तत्वज्ञान तुमचं बापूजी," तो तरुण किंचित् वैतागानें उद्गारला.

" जगांतलं सारंच तत्वज्ञान विचित्र आहे आपल्या परीनं ! तुम्हीं माझ्या तत्वज्ञानाला विचित्र म्हणायचं न् मी तुमच्या तत्वज्ञानाला विचित्र म्हणायचं ! पाण्यांत रहाणाऱ्या प्राण्यांनीं जमिनीवरील प्राण्यांना अजब म्हणायचं न्

जमिनीवरल्यांनीं पाण्यांतल्यांना अजब म्हणायचं त्यांतला प्रकार आहे हा! नागपुरांतल्या एकाद्या मालगुजाराचं वैभव जेव्हां तुम्ही पाहतां, तेव्हां तुमच्या मनांत असं नाहीं येत कीं, याच्या खेड्यावरल्या शेतावर किती गरिबांच्या रक्ताचं रोज पाणी होत असेल !—त्या रक्ताच्या पाण्यावर श्रीमंतीची आणि संस्कृतीची पोसणूक करणारं तुमचं तत्वज्ञान मला विचित्र वाटतं नू दुसऱ्याच्या वाटचं दूध पिण्यांत चोरी आहे असं माझ्या मनाला सांगणारं माझं तत्वज्ञान तुम्हांला विचित्र वाटतं ! ”

* * *

आज रविवार असल्यामुळें जादा पहाणीचा राऊंड होता. गुन्हाख्यान्यांतल्या कैद्यांना त्यांच्या कोठडींत बसण्याचा हुकूम असल्याकारणानें सुपरिंटेंडंटची वाट बघत ते आपआपल्या खोलींतून बसले होते. बरोबर नऊ वाजतां साहेबांची स्वारी परिवारासह आंत आली. आज आवारांत त्यांच्या नजरेला खुपणारा हरळीचा एकहि अंकुर शिल्लक नव्हता; किंवा पडवींत एकहि गवताची काडी पडलेली नव्हती. त्यांनीं समाधानी मुद्रेनें कोठड्यांच्या पाहाणीला सुरवात केली. बंदींची खात्री होती कीं, डॉक्टरनें बापूजींचें वजन कमी झाल्याचा रिपोर्ट केलेला असल्यामुळें आज कांहींतरी चकमक खास झडणार.

सुपरिंटेंडंटसाहेब बापूजींच्या कोठडीसमोर येतांच डॉक्टरनें हळूच त्यांना आठवण दिली. त्याबरोबर त्यांनीं जेलरला बापूजींना बाहेर बोलावण्यास सांगितलें.

जेलर लगेच आंत गेला.

आणि थोड्या वेळानें बापूजी बाहेर आले.

साहेबांनीं त्यांच्याकडे मोर्चा फिरवितांच त्यांनीं दोन्ही हात जोडून म्हटलें, “ नमस्कार !

“ गुड मॉर्निंग !-”

—अत्यंत रुक्ष आवाजांत त्या नमस्काराचा प्रतिध्वनि उमटला.

क्षणेक कोणींच कांहीं बोललें नाहीं.

नंतर साहेबांनीं इंग्रजींत विचारलें,—

" तुमचं वजन कमी झालं आहे ?"

" होय.–कालच मला कळलं," बापूजींनीं मराठींत उत्तर दिलें.

थोडा वेळ थांबून साहेब पुन्हा इंग्रजींत म्हणाले, " तुम्ही अन्न घेत नाहीं असं कळलं ! "

" होय. मी व्रतस्थ आहे," बापूजी मराठींत म्हणाले.

" तुरुंगांतल्या नियमाप्रमाणं व्रत वगैरे कांहीं ओळखलं जात नाहीं—"

" होय. माहित आहे तें मला. "

" मग अन्न घेतलं पाहिजे तुम्हांला; अन्न न घेणं हा गुन्हा आहे–"

" होय. तेंहि माहित आहे मला. "

" नियमाप्रमाणं तुम्ही आजारी पडल्याशिवाय मला देतां येणार नाहीं दुसरं कांहीं तुम्हांला—"

" पण मी आपल्याजवळ मागतों आहे कुठं काय ? आपणच बोलतां आहांत सारं कांहीं.–मला आपल्यापाशीं कांहींहि मागायचं नाहीं—"

" मग तक्रार नाहीं तुमची कांहीं ? "

" नाहीं ! "

" पुन्हा एकदां बजावून सांगतों तुम्हांला—अन्न न घेणं हा तुरुंगाच्या नियमाप्रमाणं गुन्हा आहे– "

" होय. पण मी व्रतस्थ असल्यामुळं तो गुन्हा केल्याशिवाय गत्यंतर नाहीं मला ! "

" ठीक ! "

साहेब लगेच छडी फिरवित पुढें झटकले.

आणि बापूजींनीं खोलींत जाऊन पुन्हा पद्मासन घातलें.

* * *

त्यानंतर दोन रविवार तसेच गेले. पंधरा दिवसांच्या या अवधींत बापूजींचें वजन दहा पौंडांनीं घटलें; व त्यांची आधींच कृश असलेली शरीरयष्टि वेलीच्या वाळून कोळ झालेल्या निष्पर्ण फांद्यांसारखी दिसूं लागली. पण त्यांच्या

चेहऱ्यावरली प्रसन्नता कधीं ढळली नाहीं किंवा डोळ्यांतलें तेज कधीं कमी झालें नाहीं. दर पहाणीच्या वेळीं सुपरिंटेंडंट त्यांच्या कोठडीवरून जात असत. पण त्यांनीं एकदांहि बापूजींची चौकशी केली नाहीं. त्यामुळें सर्व बंदींना अशी भीति वाटली कीं, बापूजींचा हा शरीरशोष कांहीं आतां थांबत नाहीं. आपल्या वाटचें दूध त्यांनीं घ्यावें, म्हणून कांहीं बंदींनीं त्यांच्या परोपरीनें विनवण्या केल्या. पण तो त्यांचा आग्रह बापूजी हंसण्यावर नेत.

शनिवारीं नेहमींप्रमाणें जेव्हां बंदींचें वजन करण्यांत आलें, तेव्हां त्या तरुण बंदीनें डॉक्टरला विचारलें—

" कां हो, तुम्ही बापूजींचं वजन कमी झाल्याचा रिपोर्ट नाहीं का केला साहेबांकडे ? "

" केला तर ! न करून कसं चालेल ? प्रत्येक आठवडयाला रिपोर्ट जातो साहेबांच्या नजरेखालून ! "

" मग कांहींच व्यवस्था कशी होत नाहीं बापूजींना फळं देण्याची ? "

" अहो, ते आजारी कुठं पडले आहेत त्यांना फळं द्यायला तुरुंगाच्या नियमाप्रमाणं ? बाकी या खेपेला फारच कमी झालेलं दिसतंय वजन.—बघूं या उद्यां काय म्हणतात साहेब तें ! " डॉक्टर हळूच त्याला म्हणाला.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नऊ वाजतां साहेबांची स्वारी पहाणी करीत करीत गुन्हाखान्यांत आली. इतर कोठड्या पाहून झाल्यावर ते बापूजींच्या कोठडीसमोर येऊन उभे राहिले; व डॉक्टरला त्यांनीं बापूजींना बाहेर बोलावण्याचा हुकूम केला.

थोडया वेळानें बापूजींनीं बाहेर येऊन साहेबांना नमस्कार केला.

" गुड मॉर्निंग !-कशी काय प्रकृति आहे तुमची ? " साहेबांनीं इंग्रजींत विचारलें.

" प्रकृति तर छान आहे माझी, " बापूजींनीं मराठींत उत्तर दिलें.

" पण वजन तर फार कमी झालेलं दिसतंय ? "

" होय. मी अन्न घेत नाहीं त्याचा परिणाम असावा बहुतेक–"

" अन्न न घेणं हा गुन्हा आहे न् म्हणून तुम्हांला सूट नाहीं मिळणार कांहीं शेवटीं—"

" मी अपेक्षाहि केली नाहीं कधीं असल्या सवलतींची !–व्रतस्थाचं जविन त्यानं स्वतः घालून घेतलेल्या बंधनांनीं निगडित झालेलं असतं. इतर बंधनं तो जाणत नाहीं–"

" तुमच्या या 'व्रतस्थ' शब्दाचा अर्थ नाहीं कळला मला—"

" मी दूध आणि फळं यांच्याशिवाय दुसरं कांहीं खाऊं शकत नाहीं—"

" पण आजारी माणसाशिवाय आम्ही कुणालाच दूध आणि फळं देत नाहीं—"

" माहित आहे मला तो नियम ! "

" तुम्हाला कांहीं अशक्तपणा–ग्लानि वाटते ? "

" नाहीं.–माझी प्रकृति अगदीं नेहमींइतकीच उत्तम आहे—"

" मग कांहीं इलाज नाहीं माझा !– तुम्ही अन्न घेऊं शकत असलांत तर पहा–"

" मी आपल्याला एकदां सांगितलं मी व्रतस्थ आहे म्हणून—"

" जेल मॅन्युअल असल्या गोष्टी जाणत नाहीं. ठीक— ! "

* * *

त्या रात्रीं बापूजींच्यासाठीं नेहमींप्रमाणेंच अदपाव दूध आलें. त्यामुळें सर्व बंदींची फार निराशा झाली; व सुपरिंटेंडंटच्या या धोरणाचा निषेध करण्यासाठीं कोणत्या उपायाचा अवलंब करावा, याबद्दल कडाक्याचा वाद झाला. भंडाऱ्याच्या त्या तरुण बंदीनें सामुदायिक अन्नत्यागाचा उपाय सुचविला. तेव्हां दुसऱ्या एका प्रौढ बंदीनें त्यावर फक्त दुग्धत्याग करण्याची सूचना आणली. तिसऱ्या एका बंदीनें असें सुचविलें कीं, सुपरिंटेंडंटच्या कृत्याचा निषेध म्हणून आपण आपल्या वाटचें दूध बापूजींना आळीपाळीनें द्यावें व ही गोष्ट सुपरिंटेंडंटच्या मुद्दाम कानांवरहि घालावी.

चर्चा जेव्हां या थराला येऊन पोंचली, तेव्हां इतका वेळ मुग्ध असलेले बापूजी हंसून म्हणाले, " तुम्ही कांहीं त्रास करून घेऊं नका आपल्याला माझ्यासाठीं ! संसारी माणसांनीं व्रतस्थांच्या भानगडींत पडूं नये कधीं—"

" मग काय तुम्हांला आमच्या डोळ्यांदेखत झिजत झिजत मरूं द्यावं आम्ही ?" तो तरुण बंदी रागानें उद्गारला.

" चूक आहे तुमची. माझ्या मरणाबद्दलची तुमची भीति व्यर्थ आहे. सुपरिंटेंडंट हे डॉक्टर असल्यामुळं त्यांना भय नाहीं वाटत माझ्या कमी होत असलेल्या वजनाचं—"

तो वाद तेवढयावरच थांबला.

सोमवारीं सकाळीं सारे बंदी न्याहारीसाठीं बराकीच्या ओवरींत येऊन बसले. बापूजीहि दुधासाठीं पेला घेऊन आले होते.

तोंच आवाराचें दार उघडून डॉक्टर व त्यांच्या मागून वॉर्डर आंत आला. त्याच्या हातांत मोसंबी आणि केळीं भरलेली एक लहानशी टोपली होती.

डॉक्टर बराकींत आले व त्यांनीं ती टोपली बापूजींच्या पुढें ठेवली.

बापूजीनीं त्यांच्याकडे बघून विचारलें,—

" याचा अर्थ समजला नाहीं मला— "

" आपल्यासाठीं फळं पाठवलीं आहेत हीं साहेबांनीं; व दूधहि आजपासून शेरभर मिळत जाईल आपल्याला.—जरूर वाटली तर पुढं वाढवूंदेखील ! "

" एकंदरींत बापूजींचं व्रत मान्य केलेलं दिसतंय साहेबांनीं ! " तो तरुण बंदी अभिमानानें डॉक्टरकडे पहात म्हणाला.

" नाहीं.—हा पहा काल लिहिलेला हुकूम ! कैद्याचं वजन फार कमी झाल्यामुळं अन्नांत बदल करण्यांत आला ( Change of Diet) आहे एवढंच !"

आणि डॉक्टरसाहेब निर्विकार मुद्रेनें परत फिरले.

बापूजींनीं त्या टोपलींतला केळ्यांचा फणा उचलला; व त्यांतलें फक्त एक केळें स्वत:साठीं ठेवून बाकीचीं इतर बंदींना दिलीं. मोसंबेंहि फक्त एकच त्यांनीं स्वत:साठीं ठेवलें.

ते वृद्ध बंदी मोसंब्याची फोड तोंडांत घालून ती चघळीत उद्गारले, " बापूजी, अखेर तुम्ही मात केली साहेबांवर ! "

बापूजी हंसून म्हणाले, " छे हो !– साहेब अजिंक्य आहेत. त्यांनीं फक्त अन्नांत बदल केला. माझं व्रत कुठें मान्य केलं ? "

—सत्यकथा, जुलै १९३६



## पडदानशीन मोटार

(१)

पचमढीच्या रस्त्यावरून ती पडादाशीन मोटार गेली, म्हणजे लोक हातांतलें काम टाकून ती दृष्टीआड होईपर्यंत मोठया कुतूहलानें तिच्याकडे पहात असत.

त्या मोटारींत कोणत्या व्यक्ति बसलेल्या आहेत याची लोकांना काहींच कल्पना नसे किंवा त्यांपैकीं एकहि व्यक्ति त्यांच्या कधीं दृष्टीस पडण्याचा संभव नव्हता. तरी सुद्धां ती मोटार रस्त्यावरून भर्रकन गेली, म्हणजे पचमढीच्या पठारावरील त्या सर्वांत उंच बंगल्याकडे बोट दाखवून लोक, त्या मोटारींतून कोणती व्यक्ति त्या वेळीं गेली असावी, याची चर्चा जोराजोरानें करीत असत.

आणि ती मोटारहि आठवडयांतून फक्त दोनच वेळां त्या रस्त्यानें जात येत असे. शनिवारीं सायंकाळीं ती पचमढीकडे येतांना दिसावयाची व सोमवारीं सकाळीं ती पचमढीहून परत जातांना दिसावयाची.

शनिवारीं सायंकाळीं ती मोटार ज्या बंगल्यांत नियमानें प्रवेश करीत असे, तो बंगला खरोखरीच फार रमणीय होता. पचमढीच्या पठारावर जागोजाग असलेल्या टेकाडांपैकीं सर्वांत उंच टेकाडावर तो बांधलेला होता. रात्रीच्या वेळीं त्या काळयाभोर उभट टेकाडावर तो विद्युद्दीपांनीं प्रकाशित केलेला पांढरा शुभ्र बंगला एकाद्या श्रीमान् हबशाच्या केसाळ डोक्यावर घातलेल्या रत्नजडित शिरपेचासारखा दिसत असे. पण, लोकांना त्या बंगल्याविषयीं जें इतकें आकर्षण वाटे, तें त्याच्या रम्यतेमुळें मात्र नव्हे; तर त्यांत आठवडयांतून फक्त दोनच रात्र येऊन राहाणाऱ्या व्यक्तीच्या हालचालींच्या गूढतेमुळें.

ती व्यक्ती म्हणजे महाराणी चंद्रमणि देवी.

महाराणीचें नांव अनेक कारणांमुळें हिंदुस्थानांत गाजलेलें होतें. स्त्रियांच्या चळवळीची सूत्रधार म्हणून, उत्कृष्ट बीन वाजविणारी म्हणून व हिंदुस्थानांतील अत्यंत सुंदर युवती म्हणून तिचा लौकिक सर्वदूर पसरलेला होता. पण याहिपेक्षां एका निराळ्याच कारणामुळें तिला जास्त प्रसिद्धि मिळून गेली होती. मध्यहिंदुस्थानांतील एका प्रमुख संस्थानिकाची ती पत्नी होती. लग्न झाल्यानंतर तिला लवकरच कळून चुकलें कीं, या माण-साबरोबर आपल्याला संसार करणें अशक्य आहे; व पतिपत्नींचें वितुष्ट वर्षाच्या आंतच इतकें विकोपाला गेलें कीं, महाराज कामेश्वरसिंग यांनीं तिच्या महालावर शेवटीं पहारा बसविला. तेव्हां महाराणीनें या नजरकैदेविरुद्ध हिंदुस्थानसरकारकडे तक्रार केली. तिचे वडील महाराज सर भूपेंद्रसिंग हे नरेंद्रमंडळाचे अध्यक्ष असल्यामुळें, तिच्या गाऱ्हाण्याची दाद तावडतोब लागून, सरकारनें तिची सर्व व्यवस्था स्वतंत्र करून दिली. मात्र ती व्यवस्था करतांना तिच्यावर असें बंधन घातलें कीं, तिनें केव्हांहि पतीच्या परवानगीशिवाय संस्थान सोडून बाहेर जातां कामा नये; व त्याबरोबरच महाराजांनाहि अशी अट घातली कीं, त्यांनीं तिची आगाऊ अनुमति घेतल्याशिवाय तिच्या महालांत प्रवेश करतां कामा नये. हिंदुस्थानसरकारनें राणीवर घातलेल्या या बंधनामुळें तिला संस्थानांत अगदीं कोंडल्यासारखें होऊन गेलें. म्हणून तिनें पुन्हा सरकारकडे तक्रार करून पचमढीवर असलेल्या संस्थानाच्या मालकीच्या बंगल्यांत आठवडयांतून दोन दिवस जाऊन रहाण्याची परवानगी मागितली. महाराजांनीं या तिच्या मागणीला फार जोराचा विरोध केला. पण, त्याचा कांहीं एक उपयोग न होतां, महाराणीला ती सवलत अखेर हिंदुस्थान सरकारनें दिली.

तेव्हांपासून दर शनिवारीं सायंकाळीं पचमढीच्या रस्त्यावर ती पडदानशीन मोटार नेमानें दिसूं लागली.

(२)

" किती वेळ चालणार आहे हें तुझं खुटया पिरगळणं किशोर ? "

" मनाजोगे सूर लागेतोंपर्यंत—"

" अगदीं यःकश्चित् सुखासाठीं देखील माणसाला अतिशय कष्ट करावे लागावेत, असा कायदा दिसतो निसर्गाचा ! नाहीं तर बीन तें काय आणि त्याचे सूर ते काय ? कोणतंहि सुख मिळविण्यासाठीं इतके कष्ट करावे लागतात कीं, मग जरी तें सुख पदरांत पडलं, तरी त्याची गोडी मात्र सगळी निघून जाते !— मी करूं तुला थोडी मदत ?—"

बोलतां बोलतां उठण्याच्या अपेक्षेनें तिनें आपल्या अंगावरील काश्मीरी रग किंचित् बाजूला ढकलला.

फुलांच्या पखरणीवर पसरलेल्या नागिणीनें फसफस करावें, तशी काश्मीरी रगाच्या मऊ राशींत लपलेल्या तिच्या नाजूक शरीराची हालचाल होती ती.

" नको, नको !— आपल्याला तसदी घेण्याचं कांहीं कारण नाहीं राणीसाहेब ! आतां एक पांच दहा मिनिटांतच मी सूर लावतों बघा —"

" सूर लावण्यांतच जर मध्यरात्र होऊन गेली, तर मग बीन वाजवणार कधीं आपण ?—

"कां बरं ? सारी रात्र आपलीच आहे आतां—"

" कुणाला ठाऊक ! "

" असं कां बोलतां आज आपण राणीसाहेब ? "

" तामियाच्या जंगलापर्यंत आपल्या मोटारीच्या मागून दुसरी मोटार पाठलाग करीत येत होती हें लक्षांत आहे ना तुझ्या ? —"

" होय. पण नंतर ती मोटार मागं पडली व आपण सुरक्षित इथं आलों—"

" तरीसुद्धां धास्ती गेली नाहीं माझ्या मनांतली अजून ! मी इथं कशासाठीं न् कुणाकरतां येतें याची काय कल्पना नसेल का महाराजांना ? काल रात्रीं या वेळीं ते माझ्या महालांत आले होते !—"

" आश्चर्य आहे. तुमच्या परवानगीशिवाय ते तुमच्या महालांत कसे आले ? "

" त्यांना कशाला हवी परवानगी ? ते माझे पति आहेत, संस्थानाचे

अधिपति आहेत. बड्या लाटांचा हुकूम अशा वेळीं धूळ खात पडतो दिल्लीच्या दप्तरांत !—"

" एवढया रात्रीं कशाला आले होते ते आपल्याकडे ?—

" गादीसाठीं वारस पैदा करायची घाई सुटली आहे ना त्यांना ! आपल्याबरोबर आणखी त्या इस्माईल पहिलवानाला आणला होता त्यांनीं !—"

" काय सांगतां तुम्ही हें राणीसाहेब ? "

" त्यांत नवल वाटण्यासारखं काय आहे एवढं ?—राज्याला कुठून तरी वारस पैदा केला म्हणजे झालं !—मग तो कशा रीतीनं का निर्माण झालेला असेना !—राजवंशांच्या बाबतींत फक्त सातत्य पहायचं असतं, पावित्र्य नव्हे !—"

" मग आपण काय सांगितलं त्यांना ?"

" मी त्यांना म्हटलं—' आधीं माझ्या महालाच्या बाहेर व्हा ! ' —तेव्हां त्यांनीं आपल्या हातांतला हंटर माझ्या अंगावर उडवला. त्याबरोबर मी आंतल्या खोलींत पळालें न् मरियमनं दार लावून घेतलं आंतून खोलीचं—"

" त्यांनीं काय केलं मग ? "

" ते इतके नशा केलेले होते कीं, त्यांच्या पायांत एक पाऊल टाकण्याचं त्राण नव्हतं. नाही तर त्यांनीं खचित काल चामडी लोळवली असती माझी ! नंतर शिव्या देत उभे होते कांहीं वेळ.—" तुझ्यासकट महाल जाळून टाकीन तुझा ! "—असं कांहीं तरी तोंडाला येईल तें बडबडत होते सारखं. —शेवटीं त्यांच्याबरोबरच्या माणसांनीं समजूत घालून नेलं त्यांना कसबसं परत. हा पहा कालचा त्यांचा पराक्रम ! "

—तिनें आपल्या हातांतला मोजा काढून तो किशोरसमोर धरला. त्या हातावर तिरपा लाल जाड वण उठलेला होता.

" असं पशुसारखं वर्तन करवतं कसं या माणसांना ? "

" यांना माणसं म्हणायचं कशाबद्दल ? माणुसकीचं एक तरी

लक्षण शिल्लक आहे का त्यांच्या ठिकाणीं ? खरोखरी त्यांच्या तावडींतून कोणीच का सोडवूं शकणार नाहीं मला ?—"

तिच्या तोंडून ते शब्द बाहेर पडतांच किशोरसिंगानें हातांतलें बीन खालीं ठवलें; व तो तिच्या जवळ जाऊन म्हणाला, " आपण परवानगी द्या राणीसाहेब !—म्हणजे उद्यां दुपारीं बाराच्या आंत गर्दन कापून हजर करतों त्यांची आपल्यासमोर !—

" त्याबद्दल शंका नाहीं मला मुळींच ! पण मग माझ्या साऱ्या दुनियेंत दुर्लौकिक होऊन कुत्र्याच्या मोतीनं मरावं लागेल आपणां दोघांनाहि.— छे, तो विचारसुद्धां मनांत नाहीं आणतां कामा ! माझा जन्म असाच जायचा आहे सारा त्यांच्या हंटरचे तडाखे खात !—"

तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले.

किशोरसिंग तिच्या पायाशीं जाऊन बसला; व तिच्याकडे करुण दृष्टीनें पहात म्हणाला, " तुम्हांला नाव बदलून परदेशीं जाऊन रहातां येणार नाहीं का ? "

" नाहीं.—मी राजस्त्री, एका मोठ्या संस्थानाची महाराणी आहे किशोर !—संस्थानच्या गुप्त हेरांपेक्षांहि हिंदुस्थान सरकारच्या गुप्त हेरांची सक्त नजर असेल माझ्या हालचालींवर ! माझ्या प्रत्येक कृत्याची नोंद वडया लाटांकडे जात असेल आठवडयाच्या आठवडयाला ! मी उद्यां केवढेंहि नामांतर न् वेषांतर करून परदेशीं जायला निघालें, तरी बोटीवर पाय ठवल्याबरोबर पकडण्यांत येईल मला ! हीच जर मी एकादी सामान्य स्त्री असतें तर तुला घेऊन मी कुठेंहि जाऊन राहिलें असतें पृथ्वीच्या पाठीवर ! पण मी राजस्त्री, महाराणी आहे ना !—मला मुकाट्यानं ही गांजणूक सोसली पाहिजे जन्मभर. कुळाच्या नसत्या अभिमानानं माझ्यासारख्या किती राजकन्यांच्या आयुष्याचं मातेरं होत असेल कोण जाणे ! माझ्या मावशीच्या जीविताचा त्यांनीं कसा विचका केला हें माहित होतं बाप्पांना. तरीसुद्धां मी महाराणी होईन न् माझा मुलगा गादीवर बसेल या आशेनं त्यांनीं या दारुडया, बदफैली, उतार वय झालेल्या नराध-

माझ्या गळ्यांत बांधली मला ! मावशीच्या उरावर भाची सवत ! आणि आतां गादीला वारस पैदा व्हायला हवा म्हणून वाटेल त्या हलकट माणसाला आणून माझ्यासमोर उभा करतात. खरोखरी, एकाद्या बाजारबसवीपेक्षांसुद्धां आम्हां राजस्त्रियांचं जीवित हें अधिक लाचार, अधिक लाजिरवाणं असतं —"

—तिनें दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून दिवाणाच्या (Divan) पाठीवर मस्तक टेंकलें.

तिला जोराचा हुंदका आला.

किशोर तिच्या अगदीं जवळ गेला व तिच्या हातावर त्यानें हळूच आपला हात ठेवला.

त्याबरोबर तिनें एकदम उठून त्याच्या गळ्यांत हात घातला व त्याला जवळ ओढून ती उद्गारली, "किशोर, माझा किशोर !—"

तिच्या तोंडून ते आर्त उद्गार निघतांच त्या बलशाली तरुणानें, आपले सुदीर्घ हात तिच्या शरीराभोंवतीं लपेटून, तिला घट्ट आलिंगन दिलें; व तिच्या दाट पापण्यांवर सांकळलेलें पाणी ओठानें टिपून तो उद्गारला, " चंद्रमणि, चंद्रम !—"

आंत आणि बाहेर सर्वत्र यावेळीं शांतता पसरलेली होती. पचमढीवरील छोटया उन्हाळ्याचे दिवस होते ते. दिवाणखान्याच्या दोन्ही कोंपऱ्यांत असलेल्या भिंतींतील शेगडया संथपणें जळत होत्या. तरीसुद्धां उघडया असलेल्या खिडक्यांतून आंत येणाऱ्या वाऱ्याच्या थंड झुळकांमुळें आंतील गारठा फारसा कमी झाला नव्हता बाहेर पडलेल्या चांदण्याचा उन्माद फुलांच्या परिमळाबरोबर आंत येत होता; व त्यामुळें हुक्क्याच्या गंधानें कुंद झालेल्या आंतील वातावरणांत एक प्रकारची अव्याज माधुरी उत्पन्न झाली होती.

त्याच्या विशाल वक्षःस्थलावर मस्तक टेंकून ती किती वेळ तरी पडली होती. तो तिच्या कानांच्या आरक्त पाळ्यांचें, मानेच्या उघडया भागाचें, कुरळ्या कुसुमगंधित केंसांचें चुंबन घेत हळूहळू तिच्या कानांत सारखें कांहीं तरी कुजबुजत होता.

त्या स्थितींत बराच वेळ गेल्यावर शेवटीं ती उठून त्याला म्हणाली, "मला स्वतःच्या जिवाची भीती नाहीं वाटत एवढी ! कारण माझ्या जिवाला जर अपाय झाला, तर सिंहासनाला मुकण्याचा प्रसंग येईल आपल्यावर याची जाणीव आहे त्यांना ! पण मला तुझ्या जिवाची मात्र फार भीति वाटतें—"

" माझं रक्षण करायला मी समर्थ आहे, चंद्रम ! शिवाय मी त्यांच्या हातीं सांपडणार कसा ? त्यांनीं या बंगल्यावर छापा घालूनच मला पकडलं तर ! एरवीं ब्रिटिश हद्दींत कांहीं त्यांना मला कारण दाखवल्याशिवाय पकडणं शक्य नाहीं."

"पण समज, मी पचमढीला येत असतांना तूं वाटेंतल्या कुठल्या तरी डाकबंगल्यावर मला भेटून माझ्याबरोबर पुढं येतोस हें त्यांना कळलं न् वाटेंत त्यांनीं तुला एकटा गांठून तुझा घातपात केला तर ! आपण प्रत्येक वेळेला वेगळ्या डाकबंगल्यांत भेटतों हें खरं.—पण कुणी सांगावं ते नजर ठेवून कसा घात करतील ते ?"

"नाहीं. ब्रिटिश हद्दींत माझ्या अंगावर हात टाकणं शक्य नाहीं त्यांना.——जर कांहीं दगा होण्याची शक्यता असेल तर ती फक्त या बंगल्यांत आणि तें मात्र अगदीं सहज शक्य आहे. शिकारीसाठीं म्हणून मी बाहेर पडतों, तो तुझ्याबरोबर इथं येतों हें माहित नाहीं कुणालाहि आमच्या घरीं.——इथून छापा घालून जर त्यांनीं मला संस्थानांत नेलं न् माझा तिकडच्या तिकडे निकाल लावला, तर मात्र कळायचं नाहीं कुणाला !——"

" नको नको ! आठवड्यांतून ज्या एकाद दोन रात्री लाभायच्या, त्यांत ही अभद्र चर्चा कशाला ? तूं बीन वाजव आतां म्हणजे विसर पडेल मला या सगळ्या मनोवेदनांचा——"

(३)

त्यानंतर चार महिन्यांनीं महाराणीला गर्भ राहिल्याची बातमी मोठ्या थाटानें विधिपूर्वक जाहीर करण्यांत आली.

गादीला अखेर एकदांचा वारस पैदा होणार या आशेनें महाराजांना

आनंद झाला खरा; पण त्याबरोबरच, राणीचा हा प्रियकर कोण असावा, हें जाणण्याचीहि त्यांना विलक्षण उत्कंठा लागली आपण सुचविलेल्या पुरुषाशीं तिनें संबंध ठेवण्याचें नाकारलें;—इतकेंच नव्हे, तर त्याला घेऊन आपण तिच्या महालांत गेलों असतां त्याच्या समक्ष तिनें आपला उपमर्द केला, ही गोष्ट त्यांच्या मनांत सारखी डांचत होती. त्यामुळें पुत्रजन्माच्या आशेबरोबरच राणीच्या वल्लभाला पकडून तिचा सूड घेण्याची लालसाहि त्यांच्या मनांत तीव्रतेनें जागृत झाली.

पण अलिकडे तर महाराणीची भेट घेणें त्यांना पूर्वीपेक्षांही दुष्कर होऊन बसलें होतें.

कारण, आपल्याला गर्भ राहिला आहे हें लक्षांत येतांच, राणीनें ती गोष्ट आपल्या पित्याला कळवून, त्याच्या मार्फत पोलिटिकल एजंटाकडे जादा संरक्षणाची मागणी केली; व तें लगेच तिला मिळालेंही. त्यामुळें महाराणीच्या महालाला आतां वेढा घातलेल्या किल्ल्याचें स्वरूप प्राप्त झालें होतें. तिच्या परिवारांतील सारे लोक तिनें आपल्या माहेरून आणलेले असल्यामुळें फितुरीचाहि प्रयोग यशस्वी होण्याची शक्यता नव्हती. अशाहि बंदोबस्ताच्या स्थितींत तिच्या महालांत अचानक घुसून महाराजांनीं तिला सरळच जाब विचारला असता. पण, त्यांना अशी भीति वाटली कीं, सध्यांच्या चमत्कारिक परिस्थितींत आपण तिला जबरदस्तीनें भेटलों व त्याबद्दल जर तिनें हिंदुस्थान सरकारकडे तक्रार केली, तर तिचा एकादे वेळीं भलताच परिणाम व्हावयाचा !

शिवाय, त्यांना हें पक्कें माहीत होतें कीं, महाराणीचा प्रियकर तिच्या महालांतील परिवारांत असणें शक्य नाहीं. किंबहुना आपल्या सर्व राज्यांतहि त्याचा पत्ता लागणें शक्य नाहीं. त्याची आणि तिची भेट पचमढीला होत असली पाहिजे. नाहीं तर दर शनिवारीं राणी एवढया उत्सुकतेनें पचमढीला जाण्याची यातायात करती ना.

म्हणून महाराजांनीं एक निराळाच डाव टाकला. त्यांनीं हिंदुस्थान

सरकारकडे अशी तक्रार केली कीं, महाराणी गर्भवति असल्यामुळें तिच्या प्रकृतीच्या हल्लींच्या नाजूक स्थितींत तिनें दर आठवड्याला पचमढीचा प्रवास करणें धोक्याचें आहे; व ही गोष्ट लक्षांत घेऊन सरकारनें तिच्या त्या प्रवासाला आतां मनाई करावी.

पण, राणीनें यावर सरकारला असें कळविलें कीं, महाराजांच्या त्रासामुळें आपल्याला जवळ जवळ नजर कैदेंत आयुष्य कंठावें लागतें. पचमढीचा प्रवास हें जणुं कांहीं आपल्या बंदिस्त—साऱ्या बाजूंनीं कोंडून घातलेल्या जीवनाचें एकच एक गवाक्ष आहे; व तें जर बंद करण्यांत आलें, तर आपल्या प्रकृतीवर त्याचा अत्यंत अनिष्ट परिणाम होईल. हिंदुस्थान सरकारला हें तिचें म्हणणें पटलें. आणि तिचा पचमढीचा प्रवास बंद करण्याचा महाराजांचा डाव रुफशेल हुकला.

पण त्याबरोबरच महाराजांची अशी खात्री होऊन चुकली कीं, पचमढीचा बंगला हें महाराणीचें आपल्या प्रियकराला भेटण्याचें एकच एक संकेतस्थान आहे.

त्यानतर एक महिना अगदीं निवांतपणानें गेला.

आज महाराणी स्वतः बीन वाजवीत होती. आणि, तेंहि इतक्या तन्मयतेनें कीं, मध्यरात्र उलटून जाऊन चंद्र क्षितिजाच्या कडेवर आला व त्याच्या पिवळसर प्रकाशांत सृष्टीचीं गात्रें पांढुर दिसूं लागलीं, तरी तिचा बीनवरील हात थांबला नाहीं. तिला विश्रांति देण्याच्या उद्देशानें किशोरनें एक दोन वेळां स्वतः बीन वाजविण्याची उत्सुकता दर्शविली. पण राणीच्या तें लक्षांतहि आलें नाहीं; व गेल्या दोन अडीच वर्षांच्या त्यांच्या प्रणयजीवनांत ज्या किशोरच्या मनाला असूयेचा स्पर्श चुकूनहि कधीं झाला नव्हता, त्याला त्या बीनविषयीं आज मनापासून मत्सर वाटला. त्या वाद्याविषयींच्या आसक्तीनेंच वस्तुतः त्या दोघांना एकत्र आणलें होतें. आणि त्याच्या तारांच्या कंपनानें कंपित झालेल्या त्यांच्या हृदयांतून किती तरी वेळां अनुरागाचे संवादी सूर उसळले होते. पण आज त्या वादनाच्या नादांत राणीला स्वतःचा विसर पडला, त्याचाहि विसर पडला. तिची अशी एक लकब होती कीं, तिचें मन विषेश प्रसन्न असल्याशिवाय ती स्वतः कधीं बीन वाजवित नसे. त्यामुळें तर तिच्याशीं बोलावयाला, तिच्या, त्या आनं-

दाचें कारण समजावून घ्यावयाला तो विशेषच अधीर झाला होता. बंगल्यांत आल्यावर जेवणाच्या वेळीं नोकरांसमोर कांहीं बोलावयाचें नाहीं. म्हणून राणी मुग्ध होती; व दिवाणखान्यांत आल्यावर तिनें जें बीन एकदा वाजवावयाला घेतलें, त्यांत तिचें मन इतकें कांहीं रमून गेलें कीं, किशोर आपल्यासमोर बसला आहे याचें भान तिला मुळींच उरलें नाहीं.

आणि त्याला कारणहि पण खरोखरी तसेंच होतें. लग्न झाल्यापासून गेल्या तीन वर्षांत इतक्या आनंदामध्यें तिचा एकहि दिवस गेला नव्हता. तिच्या माहेरून दोहद-कौतुकाचा अहेर घेऊन आलेल्या तिच्या काकाजींचा आज महाराजांनीं दरबार भरवून सन्मान केला; व दुपारीं त्यांना थाटाची मेजवानीहि दिली. आपल्या माहेरच्या माणसांचा अपमान करण्यांत धन्यता मानणारे महराज आपल्या काकाजींशीं इतक्या चांगुलपणानें आज कसे वागले याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटत होतें. सासरा आणि जांवई यांच्यांत वैर उत्पन्न करण्याला कारण झालेला लग्न संबंध !—त्या लग्नसंबंधांत सौहार्दाचा जिव्हाळा व्यक्त झालेला तिनें आजच प्रथम पाहिला होता.

आणि त्या प्रसन्न मनःस्थितींतच ती पचमढीला आली होती.

किशोरला तिच्या या मनःस्थितीची कांहीं कल्पना नव्हती. आल्यापासून ती त्याच्याशीं कांहीं बोलली नाहीं, त्यानेंहि तिला कांहीं विचारलें नाहीं. तो तिचा प्रियकर असला, तरी फक्त एकांतांत;—तिच्या प्रभावी मनाची आणि मनस्वी प्रेमाची लहर लागेल तेव्हां ! तिच्या पायाशीं या वेळीं असलेलें बीन हें जसें ती त्याला हातांनीं उचलील त्याच वेळीं तिच्याजवळ जात असें, तिच्या आरक्त नखांचा स्पर्श होईल त्याच वेळीं तिच्या मनाजोगे बोल काढीत असे, तशीच स्थिति त्याचीहि होती. तिच्या प्रेमाला उधाणाची भरती आली, म्हणजे त्या वेळीं तिचें व्यक्तित्व, तिची राणीपणाची जाणीव तींत बुडून, लोपून जात असे, व त्या आत्मविस्मृतीच्या क्षणीं ती त्याच्या बाहुपाशांत गेली, म्हणजे तेवढ्या वेळेपुरती त्याची तिच्या मनावर सत्ता चालत असे, पण इतर वेळीं मात्र तो एक सामान्य वादक होता आणि ती एका संस्थानाची महाराणी होती ! तिच्या आत्मविस्मृतीचा, आत्मार्पणाचा क्षण हा त्याच्या आत्मगौरवाचा, आत्मपूर्तीचा क्षण असे,

जणु कांहीं, कांहीं काळ भूतलावर उतरून आपल्या उपासकाला स्वर्गसुखाचा ओझरता आस्वाद देणारी ती कोणी देवांगनाच होती !

उत्कट प्रेमाच्या तरल क्षणाशिवाय एरवीं कधींहि लुप्त न होणारें तिच्या आपल्यामधील हें अंतर किशोरला केव्हां केव्हां असह्य होत असे.

आजची ही वेळ तशा प्रकारची होती.

तिच्या इतकेंच त्यालाहि तें वाद्य प्यार होतें; त्या वाद्यानेंच तिच्या स्वर्गीय प्रेमाची प्राप्ती आपल्याला करून दिली आहे याचीहि जाणीव त्याला होती. व तिचें वादन तर त्याला अत्यंत प्रिय होतें. पण आज त्याला त्या वाद्याचा राग आला, तिच्या वादनाचा राग आला आणि तिचाहि राग आला.

त्या रागाच्या भरांत त्यानें अखेर तोंडांतील हुक्क्याची नळी काढून फेंकून दिली; व तिला हांक मारली, " चंद्रमणि, चंद्रम—"

राणीचा बीनच्या तारांवर फिरत असलेला हात एकदम थांबला—

—त्या नादसमाधींतून ती दचकून जागी झाली. आणि ती त्याला कांहीं बोलणार—

—तोंच धांवतच आंत आलेली मरियम तिला म्हणाली, " राणीसाहेब, घात झाला ! महाराज आले;—ते आतां इतक्यांत इथं येऊन पोंचतील !—"

" काय महाराज आले ! आणि येऊं कसे दिलेत तुम्ही त्यांना आंत ?—किशोर, आधीं आंत—त्या पडद्याच्या पलिकडे जा तूं !—"

आणि, किशोरसिंग पडद्याच्या आड होतो न होतो, तोंच महराज पांच सशस्त्र जवानांसह आंत घुसले.

त्यांनीं एकवार दिवाणखान्यांत चौफेर दृष्टी टाकली.

त्यांच्या प्रत्येक हालचालीवर महाराणीची नजर होती.

तिनें किंचित् पुढें येऊन त्यांना अगदीं शांतपणानें विचारलें, " आपण आज इकडे कोणीकडे ? "

" तुमचं बीन ऐकायला !—"

" त्यासाठीं एवढ्या अपरात्रीं आपण इथं येण्याची तसदी घेतलीत ? "

" होय.—तुमच्या बीनवादनाला इथं विशेष रंग भरतो असं ऐकलं होतं मी !—इथं हुक्का पडला आहे. पण तो पिणारा मात्र दिसंत नाहीं !—"

महाराजांनीं पुन्हा एकवार चौफेर पाहिलें व आपल्या बरोबरच्या जवानांना म्हटलें, "झडती घ्या या दिवाणखान्याची! –अगदीं प्रत्येक कांना न् कोंपरा शोधा—"

"थांबा.—हा बंगला माझा आहे. खबरदार इथं कोणत्या वस्तूला हात लावाल तर! महाराज, आपण व्यर्थ भलतेसलते हुकूम सोडून माझा अपमान करतां आहांत. आपल्याला काय हवं आहे तें स्पष्ट सांगा मला—"

"मला तुझ्या प्रियकराला पहायचं आहे—"

"एवढंच ना? आपण आल्याबरोबर का नाहीं सांगितलंत तसं मला?– किशोरसिंग, बाहेर या. महाराज भेटायला आले आहेत तुम्हाला मुद्दाम इथं!—"

त्याबरोबर खोलीच्या दारावरला पडदा बाजूला सारून किशोरसिंग पुढें आला; व त्यानें सरकन् म्यानांतली तरवार बाहेर काढली.

"किशोरसिंग, तरवार म्यान करा तुम्ही आपली!—माझा हुकूम आहे तुम्हांला!"

"याला कुठं तरी पाह्यलेला आठवतो—"

"होय. हे आपल्याला अपरिचित नाहींत. माझ्या लग्नाच्या वेळीं यांच्या वडिलांचें बीनवादन आपल्यासमोर झालं होतं.—त्या वेळीं हे साथ करीत होते मागं बसून.–यांच्या वडलांपाशींच बीन शिकलें मी—"

"या आपल्या प्रियकराला भेटण्यासाठीं पचमढीला येत असतेस तूं दर शनिवारीं?"

"होय.–मग काय मी त्या पहिलवानाच्या सहवासांत आयुष्य घालवूं?"

"त्या पहिलवानांत आणि या तुझ्या साजिंद्यांत काय फरक आहे!"

किशोरचा हात एकदम म्यानाकडे गेला.

"शांत रहा किशोरसिंग! तो फरक पहायला जी दृष्टि हवी, ती आपल्या ठिकाणीं नाहीं हें दुर्दैव आहे आपलं! त्या दिवशीं मध्यरात्रीं त्या पहिलवानाला घेऊन जेव्हां आपण माझ्या महलांत आलांत, तेव्हांच मला कळून चुकलं कीं, आपल्या दृष्टीनं आपली राणी आणि एक बाजारबसवी यांत कांहीं फरक नाहीं.— आपला महाल म्हणजे एक कुंटणखाना आहे!"—

"खामोष!–पकडा या हरामखोराला!"

त्याबरोबर किशोरसिंगाच्या म्यानांतील तरवार पुन्हा सरकन बाहेर पडली.

पण, ते जवान त्याच्या अंगावर चालून जाणार, तोंच राणी एकदम मध्यें येऊन उद्गारली, " तुम्हांला यांना पकडायचं असेल, तर खुशाल पकडा. माझी त्या गोष्टीला मुळींच हरकत नाहीं, महाराज ! पण तुम्ही जर यांना पकडून नेलंत तर मी जिवंत रहाणार नाहीं. तुम्ही केलेलं हें कृत्य हिंदुस्थानसरकारच्या कानावर जाण्याची सारी व्यवस्था करून मग मी मरेन.—आणि माझ्या मरणामुळं तुमच्यावर सिंहासनाला, कदाचित् प्राणांनासुद्धां, मुकण्याचा प्रसंग येईल हें मात्र लक्षांत ठेवा !—"

तिनें प्रत्येक शब्द अगदीं शांतपणानें उच्चारला. जणु कांहीं, ती एकाद्या आसन्नमरण रोग्यावर, शेवटचा उपाय म्हणून, हलक्या हातानें शस्त्रक्रिया करीत होती.

तिच्या त्या उद्गारांनीं महाराजांचें अवसान विरघळलें.

ते तणतणतच तिला म्हणाले, " ठीक आहे ! आतांची वेळ सोडतों याला मी.—पण लक्षांत ठेव, लवकरच याचा निकाल लावल्याशिवाय रहाणार नाहीं मी—"

आणि ते बाहेर पडले.

त्यांच्या मोटारीचा आवाज राणीच्या कानांवर आला—

त्याच क्षणीं तिनें धाडकन् अंग टाकलें.

तिचें तें श्रांत शरीर किशोरनें आपल्या हातावर झेललें; व तिला दिवाणावर नेऊन निजविली. तिचा चेहरा इतका पांढरा फटफटीत पडला होता कीं, वाघानें जसें एका घोटांत हरिणीच्या शरीरांतील रक्त ओढून घ्यावें, तसें महाराजांच्या त्या क्रूर शब्दांनीं तिच्या शरीरांतील सारें रक्त जणु कांहीं जातां जातां शोषून घेतलें होतें. किशोरनें तिला विंझण्यानें वारा घालावयाला सुरवात केली; व मरियमनें तिच्या तोंडावर गुलाबपाण्याचा शिडकावा केला. थोड्या वेळानें तिनें डोळे उघडले. आणि आपल्याकडे भीतियुक्त दृष्टीनें बघत असलेल्या आपल्या प्रियकराला किंचित् क्षीण आवाजांत म्हटलें—

" किशोर, गेला राग माझ्यावरला ? "

आणि त्याच्या गळयांत आपला हात घालून तिनें त्याला जवळ ओढण्याचा प्रयत्न केला.

पण तिला जवळ घेण्याचा, आलिंगन देण्याचा हिय्या त्याला झाला नाहीं.

तिच्या मस्तकावरून घसरून खालीं आलेल्या ओढणींत त्यानें आपलें तोंड लपविलें व तो उद्गारला, " चंद्रमणि, चंद्रम, खरोखरीच राणी आहेत तूं !—"

( ४ )

" किशोर, कसं धाडस करवलं तुला इथं येण्याचं ? "

" त्यांत कसलं आहे धाडस ? तूं दिलेली खुणेची आंगठी माझ्याजवळ होती. त्यामुळें खात्री होती माझी कीं, मी कोणत्याहि वेषांत आलों, तरी प्रवेश मिळेल मला महालांत —"

" पण इथं येऊन मला भेटणं किती धोक्याचं आहे किशोर ! त्यांनीं त्या रात्रीं उच्चारलेले शब्द आठवतात ना तुला ? "

" होय.—पण याच्या जन्माची बातमी वर्तमानपत्रांत वाचल्यापासून केव्हां एकदां याला येऊन पाहिन असं झालं होंत मला !—"

राणीच्या मांडीवर पडलेल्या चिमुकल्या जिवाकडे पहात त्या तरुण गोसाव्यानें म्हटलें; व त्या अर्भकाच्या गालाला आपल्या अंगुलीनें हळूच स्पर्श केला. त्याबरोबर त्याच्या अंगावर रोमांच उठले.

थोड्या वेळानें तो म्हणाला, " हुबेहूब तुझ्यासारखं कपाळ न् डोळे आहेत याचे चंद्रमणि—"

" नाहीं रे ! तुझ्यासारखा आहे तो दिसायला अगदीं.—मी जेव्हां जेव्हां त्याच्याकडे पहातें, तेव्हां तेव्हां मला असं वाटतं कीं, त्याच्या डोळ्यांतून तूंच माझ्याकडे बघतो आहेस—

" मी आज दरबारालाहि हजर होतों सकाळच्या—"

" तूं काय आपला जीव पणाला लावून का आला आहेस इथं ? आणखी

थोड्या वेळानं तूं मला असंहि सांगशील कीं, 'मी महाराजांची भेट घेऊन आलों चंद्रमणि!' तुझा विचार तरी काय आहे किशोर?"

"मला युवराजचा–तुझ्या आणि माझ्या मुलाचा–जन्मोत्सव पहायचा होता; व तो पहाण्याच्या प्रयत्नांत मरण जरी आलं मला तरी त्याबद्दल आनंदच वाटेल चंद्रम! तुला माहीत नाहीं का? पुत्रप्राप्तीसाठीं नरबळी देण्याचा प्रघात होता पूर्वी कांहीं राजघराण्यांतून—"

"उगाच कशाला या आनंदाच्या वेळीं अभद्र बोलतोस किशोर?—"

तिनें त्याच्या तोंडावर हात ठेवला.

त्या हाताचें चुंबन घेऊन तो तिला हंसून म्हणाला, "अभद्र काय आहे त्यांत? कांहीं प्राण्यांमध्यें गर्भसंभवानंतर नराला मारून टाकण्याची पद्धत नाहीं का?—त्या दिवशीं रात्रींच मरायचा मी! पण तुझ्या प्रसंगावधानामुळं नरबळी व्हायचा योग टळला माझा! परंतु त्या वेळीं मी मारला गेलों असतों, तर चुटपुट लागून गेली असती माझ्या जिवाला, माझे प्राण घोटाळत राहिले असते मागे!–आतां याला पाहिल्यावर—"

"याचा जन्म म्हणजे माझ्या आयुष्यांतलं स्थित्यंतर आहे एक मोठं—"

"होय. महाराज दरबारांत काय म्हणाले कळलं तुला?"

"नाहीं;–मला अद्याप कुणीच कांहीं सांगितलं नाहीं—"

"महाराज म्हणाले, "आज राणीसाहेबांना मुलगा आणि राज्याला वारस झाला, ही या संस्थानाच्या इतिहासांतली अत्यंत संस्मरणीय आणि आनंददायक गोष्ट आहे!" मला त्यांच्या या भाषेचं कौतुक वाटलं चंद्रम—"

"होय.—खरंच आहे त्यांचं तें म्हणणं अगदीं. गेल्या दोन पिढ्या दत्तकाच्या गेल्या आहेत या संस्थानाच्या!" तिनें गंभीरपणानें उत्तर दिलें.

—"म्हणूनच मी म्हणतें, याचा जन्म म्हणजे स्थित्यंतर आहे माझ्या आयुष्यांतलं. महाराजांना जें हवं होतं,–ज्याच्यासाठीं त्यांनीं माझ्याशीं लग्न केलं न् गेलीं तीन वर्षं मला परोपरीनं छळलं, तें त्यांना अखेर मिळालं. याच्या जबाबदारींतून मी मोकळी झालें, म्हणजे संस्थानाबाहेर कुठं तरी जाऊन—"

" एकत्र राहूं आपण !—पण तुझं हें सुखस्वप्न खरं होईल का चंद्रम ? महाराज एकत्र राहूं देतील का आपल्याला ? "

" पिताजींच्या सहाय्यानं मी प्रयत्न करून पहाणार आहे. पण किशोर तूं जा आतां—"

तिनें आपल्या मांडीवरील मुलाला हळूच पाळण्यांत ठेवला.

ती किशोरच्या अगदीं जवळ गेली व त्याच्या खांद्यावर दोन्ही हात ठेवून म्हणाली, " आतां पुन्हा येऊं नकोस तूं अशा रीतीनं – "

" मग तुझी भेट कशी होणार चंद्रम ? "

" फक्त चार महिन्यांचा प्रश्न आहे.—मग पचमढी आहे न् आपण आहोंत ! "

तिनें हंसून म्हटलें व त्याच्या वक्षःस्थलावर आपलें मस्तक टेकलें.

त्याबरोबर तिच्या धूम्रवासित केंसांचा मृदु गंध त्याला जाणवला.

त्यानें हळूच तिच्या कपाळाचें चुंबन घेतलें आणि तो बाहेर पडला.

ती पाळण्याजवळ येऊन उभी राहिली. आंत निजलेल्या मुलाकडे ती एकाग्र चित्तानें, अनिमिष नेत्रांनीं पहात होती. तिच्या डोळ्यांपुढें कसलें तरी सुखस्वप्न तरंगत, तळपत होतें.

इतक्यांत तिला कसला तरी आवाज, तरवारींचा खणखणाट ऐकूं आला;—कांहीं तरी गडबड, कोणाची तरी झटापट मधल्या चौकांत चालली आहे, असें वाटलें.

त्या आवाजानें त्या सुखस्वप्नाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या.

क्षणैक संभ्रमांत होती ती. पण लगेच तिच्या मनांत कांहीं तरी कल्पना आली.—त्या कल्पनेच्या मागोमाग अंगावर थरारून कांटा आला आणि तिनें दाराकडे धांव घेतली.

पण मरियमनें तिला दारापाशींच अडवलें.

" राणीसाहेब, पुढं जाऊं नका ! कांहीं उपयोग व्हायचा नाहीं आतां आपल्या जाण्याचा ! "

" काय झालं मारियम ? "

" किशोरसिंग मधल्या चौकांत येतात न येतात, तोंच महाराज समोरून आले. त्यांनीं लगेच किशोरजींना ओळखलं न् आपल्याबरोबरच्या जवानांना त्यांना पकडण्याचा हुकूम केला. किशोरजीनीं आपल्या कफनींतला खंजीर चालवून एका जवानाला जखमी केलं. पण मग महाराजांनीं स्वतः—"

" काय केलं महाराजांनीं ? किशोर जिवंत आहे ना ? "

" होय.–अजून तरी जिवंत असावेत राणीसाहेब !—महाराजांनीं स्वतः तरवार चालवून त्यांचा खंजीर असलेला हात खांद्यापासून उतरला.—त्यांच्या रक्तानं भिजलेले कपडे बदलताहेत महाराज ! "

हे शब्द ती उच्चारीत आहे, तोंच महाराज आंत आले.

त्याबरोबर राणीनें एकदम पुढें होऊन विचारलें, " किशोरसिंग कुठें आहेत ? "

" परलोकाच्या वाटेवर आहे तो !–राजमातेला शोभत नाहीं असलं वर्तन, राणीसाहेब ! "

" होय.—राजमाता, राजमाता ! महाराज, पूर्वजन्मींचं वैर साधलंत तुम्ही आज माझं ! किशोर, माझा किशोर ! किती भयंकर रीतीनं खरे झाले तुझे शब्द !–मी राजमाता झालें आणि तुझा बळी पडला—! "

बोलतां बोलतां तिला एकदम झीट आली.

त्यानंतर ती पडदानशीन मोटार पचमढीच्या रस्त्यावर पुन्हा दृष्टीस पडली नाहीं.

आणि तो बंगलाहि लवकरच विकण्यांत आला.

ज्योत्स्ना, सप्टेंबर १९३६



## मशिनगन

"**म**शिनगन आणणार आहेत उद्यां म्हणून ऐकलं दद्दा !--"

" आणूं द्यात, आणूं द्यात. त्यांच्या पाशवी शक्तीचं पूर्ण प्रदर्शन होऊन जाऊं द्या एकदां. आपण तर सिद्ध होऊनच बसलों आहोंत बलिदानाला, सावजी !" दद्दा आपल्या छप्परदार मिशीवरून हात फिरवीत सागरी हिंदींत उद्गारले.

सावजींचा चेहरा अगदीं पडून गेला होता. ते कांहीं वेळानें आवंढा गिळून म्हणाले, " पण हे मशिनगन आणणार तरी कशाला ? आपला तर हा अनत्याचारी संग्राम आहे !—"

" बिलकूल ! पण सरकारला आपल्या शक्तीचं प्रदर्शन करून तुम्हांला घाबरवून सोडायचं आहे ना ! हिंमत सोडूं नका सावजी तुम्ही !—" बोलतां बोलतां दद्दांनीं त्यांच्या पाठीवर दणकन थाप मारली; व ते म्हणाले,"हरिभय्याला सांगा ही बातमी सगळ्या वर्तमानपत्रांकडे पाठवायला !--"

दद्दांचा चेहरा करडा होता. देवींच्या वणांनीं डागळलेल्या त्यांच्या त्या सांवळ्या मुद्रेवर स्मिताची रेषा क्वचितच कधीं उमटली असेल. किनारा दणाणून सोडणाऱ्या भरतीच्या लांटाप्रमाणें हर्ष आणि क्रोध हे विकार उत्कटतेनें त्यांच्या मुद्रेवर प्रकट होत असत. सभेंत गलका होतांच 'शांति रक्खो' असे खणखणीत शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडले, म्हणजे युद्धाचा आदेशच जणुं कांहीं ते देत आहेत, असा भास श्रोत्यांना होत असे; व अशा वेळीं त्यांच्या काळसर डोळ्यांत खेळणारी त्वेषाची चमक समुद्रावर रात्रींच्या वेळीं पडलेल्या शोधक प्रकाशाच्या ( Search light ) झोतासारखी दिसे. शांति आणि अहिंसा यांच्या त्या युगांत दद्दांचा संचार म्हणजे त्या युगाला एक प्रकारचें मूर्तिमंत आव्हानच होतें. गांधीजींच्या

चळवळींत ते सामील झाल्याला आतां दहा वर्षें झालीं होतीं. पण खादीप्रचारा-पलिकडे आजपर्यंत दुसऱ्या कोणत्याहि कामांत त्यांनीं मन घातलें नव्हतें. परंतु नागपूर प्रांतांत जंगलसत्याग्रह सुरू करण्याचें ठरतांच त्याचें नेतृत्व आपल्याला मिळावें, असा आग्रह त्यांनीं धरला; व तदनुसार सत्याग्रहींची पहिली तुकडी बरोबर घेऊन ते तळेगांवला आले होते.

दद्दांची शिस्त अर्थातच करडी होती; व त्यांना विनोदबुद्धीचें वावडें असल्यामुळें त्या शिस्तीचा करडेपणा हा, गंजलेल्या हत्याराच्या धारेप्रमाणें, स्वयं-सेवकांना उपद्रव देत असे. स्वयंसेवकांनीं कोणत्याहि प्रकारची चैन करतां कामा नये, असें त्यांचें मत होतें. इतकेंच नव्हे, तर जंगल सत्याग्रहाच्या मोहिमेवर निघाल्यापासून त्यांनीं आपल्या आवडत्या शंकरछाप विडीला किंवा सिंदेवही साखरेच्या चहाला स्पर्शहि केला नव्हता. सत्याग्रहाला निघण्याच्या आदल्या रात्रीं स्वयंसेवकांची जी सभा झाली, तींत त्यांनीं असें निक्षून सांगितलें होतें कीं, कोणत्याहि स्वयंसेवकानें चैनीची कोणतीहि वस्तु जवळ बाळगतां कामा नये. या आपल्या हुकुमाची तामिली बरोबर होते कीं नाहीं हें पाहाण्यासाठीं ते वेळीं अवेळीं स्वयंसेवकांचें सामानसुमान तपाशीत. तरीसुद्धां मनुष्याच्या चैनीच्या स्वाभाविक आसक्तीनें त्यांना अखेर एकदां दगा दिलाच. तळेगांवला सत्याग्रहींची तुकडी पोंचल्यावर शिबिरांत प्रवेश करण्यापूर्वीं त्यांनीं साऱ्या स्वयंसेवकांची तुरुं-गाच्या पद्धतीप्रमाणें कसून शारीरिक झडती घेतली. तींत एका वयस्क सत्याग्र-हीच्या कुडत्यांत तपकिरीची छोटी जस्ती डबी त्यांना सांपडली. त्याबरोबर दद्दा त्वेषानें ओरडले, ' ये क्या है बेवकूब ? – तुझ्या या असल्या वर्तनानें तूं महा-सभेच्या नांवाला बट्टा लावशील ! " आणि ती डबी त्यांनीं संतापानें त्याच्या अंगा-वर फेंकली. चहा किंवा विडी यांच्याप्रमाणेंच तपकीर हीसुद्धां एक चैनीची वस्तु आहे, याची त्या बिचाऱ्या खेडुताला कल्पना नव्हती; व म्हणून दद्दांच्या भडिमारामुळें तो अगदीं शरमिंदा होऊन गेला. पण त्याच दिवशीं संध्याकाळीं ध्वजवंदनानंतर दद्दांनीं आपल्या तोंडून निघालेल्या या दुरुद्गारांबद्दल त्याची सर्वांसमक्ष माफी मागितली.

दद्दांची अपेक्षा अशी होती कीं, जंगल–सत्याग्रहासाठीं आपल्या नेतृत्वाखालीं

निघालेल्या या पहिल्या तुकडीला महाराजबागेच्या पलिकडे गेल्याबरोबर अटक करण्यांत येईल. शहरांत वदंताहि पण तशाच उठल्या होत्या. ते स्वतः तर तुरुंगांत जावयाला इतके अधीर झाले होते कीं, पटवर्धन मैदानांतील निरोपाची प्रचंड सभा संपल्यावर मोटारींत बसतांना ते म्हणाले, " आतां फक्त कांहीं मिनिटांचाच सवाल आहे ! " आणि, त्यांनीं आपल्या सहकाऱ्यांना, सत्याग्रहाचे पहिले सेनानी या नात्यानें, ज्या गुप्त सूचना करावयाच्या होत्या, त्या सर्व करून टाकल्या. सुदैवानें त्यांच्या मोटारीच्या मागोमागच दोघां पोलिस अधिकाऱ्यांची मोटारहि चालली होती. त्यामुळें, यदाकदाचित् सारी तुकडी पकडली गेली नाहीं, तरी आपण एकटे तरी खास पकडले जाऊं, असें दद्दांना वाटलें. पण सरकारनें त्यांच्या हिरमोड करण्याचा जणुं कांहीं विडाच उचलला होता. महाराजबाग जाऊन बाजारगांवचा मुक्काम आला, तरीहि कांहीं धरपकडीचें लक्षण दिसेना. उलट, जी पोलिस अधिकाऱ्यांची मोटार महाराजबाग क्लबापर्यंत दद्दांच्या मोटारीमागून येत होती, ती मध्येंच कुठेंतरी अदृश्य झाल्याचें लवकरच लोकांच्या निदर्शनाला आलें.

तथापि दद्दांचा धीर सुटला नाहीं. त्यांना वाटलं, गांधीजींप्रमाणें आपल्यालाहि कदाचित् मध्यरात्रीं अटक करण्यांत येईल. म्हणून त्यांनीं दोन स्वयंसेवकांना रात्रभर आपल्या खाटेजवळ खडा पहारा देण्याचा हुकूम केला. पण, मध्यरात्रीं दद्दांना अवचित जाग आला असतां, त्या झोंपीं गेलेल्या स्वयंसेवकांना त्यांनीं दिलेल्या दरडावणीशिवाय दुसरा कोणताहि शांतताभंगाचा प्रकार घडला नाहीं. किंबहुना, नागपूरपासून तळेगांवपर्यंतचा हा सारा दौरा एका अर्थानें अगदीं बेचव, अगदीं रंगविहीन असा झाला. कुठेंहि व्याख्यानाला बंदी नाहीं, सभेला मनाई नाहीं किंवा लाठीचा तडाखा नाहीं. त्यामुळें दद्दा अगदीं चिडल्यासारखे झाले आपण उतारवयांत आरंभिलेल्या या शांतिसंग्रामांत, यज्ञकर्मांत विघ्नें उपस्थित करणाऱ्या पुराणकाळच्या राक्षसांप्रमाणें, व्यत्यय आणून सरकार आपलें सत्व कसोटीला लावील, अशी त्यांची अपेक्षा होती. पण सरकारनें त्यांना निराश करण्याचा चंग बांधला होता.

त्यामुळें सावजींनी जेव्हां ही मशिनगनची बातमी दद्दांना सांगितली. तेव्हां त्याचा चेहर खुलला; सत्याग्रहाच्या या शेवटच्या घटकेला तरी कांहीं वीरकर्म होणार अशी आशा त्यांना वाटली; व त्या क्षणापासून त्यांच्या वृत्तींत एक प्रकारचा उल्हास संचारला.

त्या दिवशीं रात्रीं जवळ जवळ वीस हजार माणसें शिबिराच्या पटांगणांत जमा झाली होती. त्यांना उद्देशून जें शेवटचें निरोपाचें भाषण दद्दांनीं केलें त्यांत त्यांनीं शांति राखण्याच्या तत्त्वावर फार भर दिला. उद्यां जंगलांत मशिनगन येणार असल्याची बातमी शिबिरांत या वेळेपर्यंत सर्वत्र परसली होती. त्यामुळें दद्दांचा तो आवेशपूर्ण शांतिपाट साऱ्यांनाच मोठा रोमांचकारी वाटला.

स्वतः दद्दाहि ती बातमी कळल्यापासून आनंद आणि चिंता यांनीं अस्वथ झाले होते. त्यांना सारखी अशी भीति वाटे कीं, जंगलांत गवत कापीत असतां त्या आणिबाणीच्या वेळीं समोर मशिनगन दिसतांच जर एखाद्या स्वयंसेवकाचा धीर सुटून तो पोलिसला शरण गेला, तर आपल्या तुकडीची व पर्यायानें आपली स्वतःचीहि केवढी अप्रतिष्ठा होईल ? म्हणून मध्यरात्रीं त्यांनीं आपल्या तुकडी-तील साऱ्या सैनिकांना स्वतःच्या तंबूंत बोलविलें; व उद्यां घडणार असलेल्या प्रकाराचें अत्यंत भयानक वर्णन करून त्यांच्यापैकीं कुरबानीला कचरणारा कोणी आहे कीं काय याची कसून चांचपणी केली. सागरी पद्धतीनें किंचित नाकांत बोलणाऱ्या दद्दांचे आवेशानें मधून मधून विस्फारित होणारे लालुगे डोळे, शिबि-रांतील त्या अंधुक प्रकाशांत, मशिनगनमधून बाहेर पडणाऱ्या स्फुलिंगांसारखें दिसत होते. पण सुदैवानें सारे सैनिक शूर होते. त्यांनीं दद्दांना शपथपूर्वक असें आश्वासन दिलें कीं, मशिनगनमधून आपल्या डोक्यावर जरी अग्निवर्षाव झाला तरी आपण अंगीकृत कार्यापासून परावृत्त होणार नाहीं.

या साऱ्या गडबडींत रात्र संपून दिवस केव्हां उजाडला, हें लोकांना कळ-लेंहि नाहीं. पहाटे पांच वाजतां बिगुल वाजल्यापासून तळेगांवचें सारें मैदान माणसांच्या गांभीर्यपूर्ण हालचालीमुळें रणक्षेत्रासारखें दिसूं लागलें. जंगल—सत्याग्र-हाला निघण्यापूर्वीं जेव्हां सुवासनींनीं आघाडीला असलेल्या दद्दांना ओवाळून

त्यांच्या हातावर दहींसाखर घातली, तेव्हां मैदानांतील प्रचंड जनसमूहानें त्यांच्या नांवाचा जयजयकार केला. तो जयजयकार शांत होईपर्यंत दद्दा क्षणमात्र थांबले; व नंतर आपल्या खणखणीत आवाजांत उद्गारले, "बांधव हो, यापुढें कोणताहि प्रसंग आपल्यावर ओढवला तरी तुम्हीं शांतीपासून ढळूं नका. आपलें ब्रीद शांति-अहिंसा हें आहे !"

त्यांचे ते धीरगंभीर शब्द कानांवर पडतांच कधीं न पाहिलेली मशीनगन लोकांच्या डोळ्यांसमोर उभी राहिली;-कधीं न ऐकलेला तिचा गडगडाट त्यांच्या कानांत थरकांप करीत शिरला !

आणि सत्याग्रहींचें कूच सुरू झालें.

क्षुब्ध झालेला तो प्रचंड जनसमूह सत्याग्रहींच्या तुकडीमागून शांतपणानें चालला होता.

तळेगांवच्या राखीव जंगलाजवळ तुकडी येऊन पोंचताच रोमहर्षण असें दृश्य लोकांच्या नजरेस पडलें.

जंगलाच्या सरहद्दीलगत असलेल्या उंचवट्यावर मशिनगनसारखें दिसणारें कांहीं तरी यंत्र ठेवलेलें होतें; व पलिकडच्या बाजूला वरिष्ठ अधिकारी खुर्च्या टाकून बसलेले होते. त्या अधिकाऱ्यांभोंवतीं सशस्त्र पोलिसांची पथकें संगिनी रोखून हुकमाची वाट पहात होती. जंगलाला भिडलेल्या सडकेवर लाठियाळ पोलिस रांगेनें खडे केलेले होते. आणि गज लावलेल्या चार मोटारीहि रस्त्याच्या कडेला उभ्या होत्या.

तें दृश्य पहातांच दद्दा एकदम थबकले—

त्याबरोबर त्यांच्या मागून येणारा प्रचंड जनसमुदायहि हादरल्यासारखा होऊन थबकला. पण, मागच्या लोकांना मिरवणूक कां थांबली याचा विचार करावयाला वेळ मिळण्यापूर्वीच दद्दा एकदम आवेशानें हिंदींत उद्गारले, "बांधव हो, बलिदानाचा समय प्राप्त झाला !-आपल्या अनत्याचाराच्या ब्रीदाला जागा, शांति राखा—"

त्यांचे ते शब्द त्या जंगलांत घुसून प्रतिध्वनित झाले. आणि तो प्रतिध्वनि शांत होण्यापूर्वीच, सडकेला लागून असलेल्या पायवाटेनें सत्याग्रहींची तुकडी राखीव

जंगलांत शिरली. तिच्या मागोमाग तो प्रचंड जनसमूहहि आंत घुसला. श्रावणांतील तें हातभर वाढलेलें हिरवें, कोंवळें गवत लोकांच्या पायांखालीं तुडवलें गेलें. जंगलांत शिरतांनाच कदाचित् पोलिस अटकाव करतील व सबंध तुकडीला अटक होईल, अशी दद्दांची अपेक्षा होती. पण ती सफळ झाली नाहीं. तेव्हां ते हळूच सावर्जीना म्हणाले, " शेवटच्या क्षणापर्यंत थांबायचं न् नंतर जमावानं दंगल माजवल्याच्या सबबीवर मशिनगन चालवायची असा डाव दिसतोय—"

जंगलाच्या मध्यभागीं असलेल्या कुरणांत गेल्यावर दद्दांनीं जमावाला बसण्याचा आदेश दिला. कुरणापासून सुमारें सहासात फर्लांगावर असलेल्या उंचवट्यावर बडे बडे अधिकारी खुर्च्या टाकून बसलेले होते. सकाळच्या कोवळ्या उन्हांत त्यांच्यासमोर ठेवलेलें तें मशिनगनसारखें यंत्र चकाकत होतें. साऱ्या जमावाचे डोळे त्या यंत्रावर केंद्रित झाले होतें. व घटकाभरानें होणाऱ्या सत्याग्रहापेक्षां त्या मशिनगनविषयींच लोक आपसांत भीतीनें आणि कुतूहलानें बोलत होते. दद्दांचें शेवटचें व्याख्यान चाललें होतें. पण त्या व्याख्यानाकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें. साऱ्यांचेच डोळे त्या उन्हांत चमकणाऱ्या काळ्या निळ्या यंत्रानें आकर्षून घेतलें होते,–त्याचा गडगडाट लवकरच होणार या कल्पनेनें साऱ्यांचे कान आधींच बधिर होऊन गेले होते.

दद्दांचें भाषण संपल्यावर त्यांनीं आपल्या उपसेनानीला व खाजगी चिटणीसाला जवळ बोलावलें. त्यांचा खाजगी चिटणीस हा वर्तमानपत्रांचा बातमीदारहि होता. त्याला ते म्हणाले, " हरिभय्या नीट पाहून ठेवा ती मशिनगन ! आमच्याबरोबर जर तुम्हीं पकडलां गेलां नाहींत, तर ती मशिनगन आणल्याची बातमी साऱ्या वर्तमानपत्रांत आली पाहिजे. सारें हिंदुस्थान हलून जाईल ही बातमी कळल्यावर ! "

आणि, नंतर आपल्या उपसेनानीच्या सल्ल्यानें, साऱ्यां सत्याग्रहींना त्यांनीं मशिनगनकडे पाठ फिरवून बसविलें. हेतु असा कीं, पोलिसांच्या हालचाली दृष्टीस पडून आयत्या वेळीं त्यांच्या मनाची चलबिचल होऊं नये. त्यांच्या आज्ञेप्रमाणें हातभर वाढलेल्या त्या गांवांत सत्याग्रही आपापले विळे सरसावून

वर्तुळाकार बसल्यावर दद्दांनीं शीळ फुंकली; व ' जंगलका कानून तोड दिया ' या प्रचंड घोषणेच्या निनादांत भराभर गवत कापावयाला प्रारंभ झाला. दद्दांची कल्पना अशी होती कीं, आपण शीळ फुंकतांच वरून मशिनगनचा गडगडाट होईल. पण पुन्हा एकवार त्यांची निराशा झाली. गवत कापतां कापतां त्यांनीं हळूच मागें वळून पाहिलें. दोन गोरे अधिकारी त्या काळ्या यंत्राजवळ येऊन उभे राहिलेले, त्याला अगदीं भिडलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांना वाटलें, वेळ भरत आली; व त्यांनीं हरिभय्याला हळूच म्हटलें, " देखो भाई, तुम्ही वर्तमानपत्रांत रंगवून दिलं पाहिजे हें सारं ! "

पण, गोरे अधिकारी जरी सारखे त्या यंत्राजवळ जात, तरी एकदांहि त्या यंत्रानें गडगडाट केला नाहीं.

आणि अखेर, कोणत्याहि प्रकारचा रोमांचकारी प्रसंग न घडतां, कापलेल्या गवताचे भारे घेऊन सत्याग्रहींची तुकडी दद्दांच्या नेतृत्वाखालीं परत फिरली. पाऊलवाट संपून सडकेवर येतांच दोघां हिंदी इपिसरांनीं पुढें येऊन फक्त दद्दांना तेवढी अटक केली; व तुकडींतील बाकीच्या लोकांना तसेंच जाऊं दिलें.

लगेच अधिकाऱ्यांनीं दद्दांना बंदिस्त मोटारीजवळ आणलें. त्याबरोबर मोटारीभोंवतीं लोकांचें कडे पडलें व दद्दांचा अखेरचा निरोप घेण्यासाठीं कार्यकर्त्यांची चढाओढ सुरू झाली.

शेवटीं दद्दांनीं मोटारीच्या पायठाणावर उभे राहून लोकांना लढा अखेरपर्यंत चालविण्याचा वीरश्रीयुक्त संदेश दिला; व जवळ उभ्या असलेल्या हरिभय्याला ते हंसून म्हणाले, " भय्या, मशिनगनचं लक्षांत आहे ना ! "

आणि दुसऱ्या दिवशीं साऱ्या वर्तमानपत्रांतून तळेगांवच्या जंगल सत्याग्रहाच्या वेळीं सरकारनें मशिनगन आणल्याची बातमी मोठमोठ्या मथळ्यांच्या रूपानें फडकली. कांहीं वर्तमानपत्रांनीं तर कडक अग्रलेखसुद्धां त्या बातमीवर लिहिले.

त्यानंतर तीन दिवसांनीं हरिभय्या व त्याचे दोन सहकारी यांना जंगल सत्याग्रह केल्याबद्दल अटक झाली.

खटल्याच्या वेळीं हरिभय्यानें रीतीप्रमाणें आपला गुन्हा कबूल केला. पण त्यानंतर शिक्षा सुनावण्यापूर्वीं जादा मॅजिस्ट्रेटनें त्याला विचारलें, " तुम्ही वर्तमानपत्रांचे बातमीदार आहां ही गोष्ट खरी आहे काय ? "

" होय."

" सत्याग्रहाच्या पहिल्या दिवशीं मशिनगन आणल्याची बातमी तुम्हींच सगळीकडे पाठविली ? "

" होय."

" तुम्हीं स्वतः पूर्वी कधीं माशिनगन पाहिली होती काय ? "

" नाहीं."

" मग तुम्हांला माशिनगन आणल्याचें कसें कळलें ? "

" सत्याग्रहाच्या जागेपासून बऱ्याच अंतरावर उंचवट्यावर एक यंत्र ठेवलें होतें. ती मशिनगन होती असें लोकांना वाटलें. शिवाय सरकार मशिनगन आणणार असल्याची बातमी आधींपासून उठली होती—"

" पण उंचवट्यावर जें यंत्र ठेवलें होतें, ती माशिनगनच होती असें म्हणायला तुमच्याजवळ पुरावा काय होता ? "

" लोकांनीं मला तसें सांगितलें व मला स्वतःलाहि तसा भास झाला."

" म्हणजे लोकांच्या सांगण्यावर भरंवसा ठेवून तुम्ही ती बातमी वर्तमानपत्रांकडे पाठविली, असेंच कीं नाहीं ? "

" कदाचित् आपण म्हणतां तसें असेलहि."

" होय. वस्तुस्थितीच तशी आहे. मी तुम्हांला आतां सांगतों कीं, तुम्ही लोक ज्याला मशिनगन समजलां तो टेलिस्कोप होता ! "

" अस्सं ! "

" मग या चुकीच्या बातमीचा इनकार कराल कां आतां तुम्ही ? "

" मी अटकेंत पडल्यावर इन्कार कसा करणार ? सरकारच्या प्रसिद्धि-खात्यानं पत्रक काढून इनकार करावा वाटल्यास ! " हरिभय्यानें बेपर्वाईनें म्हटलें.

" सरकार काय करायचं न् काय नाहीं तें पाहून घेईल. पण तुम्हीं ही खोटी बातमी सर्वत्र पसरविली न् तिचा इन्कार करण्याची आतां तुमची इच्छा नाहीं, हें खरें ना ? तुम्ही स्वतःला सत्याग्रही म्हणवितां;--छान आहे सत्यनिष्ठा तुमची ! "

" आपण कांहींहि म्हणा ! माझ्या डोळ्यांना तें यंत्र मशिनगनसारखं दिसलं, म्हणून मी तशी बातमी दिली. मी बुद्धिपुरःसर सत्यापलाप केला नाहीं हें उघड आहे—"

" तें मीहि जाणतों. म्हणूनच मी तुम्हांला त्या खोट्या बातमीचा इनकार करायला सांगत आहे—"

" सरकारच्या प्रसिद्धिखात्यानं आतां तें काम करावं. मी तर तुरुंगाच्या वाटेला लागलों आहे—"

" मग तुमच्या या खोटेपणाच्या कारवाईचे परिणाम तुम्हाला भोगावे लागतील—"

" ते परिणाम भोगण्याच्या तयारीनंच मी आपल्यापुढं उभा आहे—"

मॅजिस्ट्रेटनें निकालाच्या कागदावर आणखी कांहीं मजकूर लिहिला.

संध्याकाळीं त्या तिघां बंदींची तुरुंगांत रवानगी झाली.

तुरुंगाच्या प्रवेशाच्या वेळचे प्राथमिक विधि आटोपल्यावर त्या तिघां बंदी-पैकीं फक्त हरिभय्याला वेगळा काढण्यांत आला; व त्याला गुन्हाखान्याकडे ( Solitary cell ) नेण्याचा हुकूम जेलरनें फर्माविला.

गुन्हाखान्यांतील एकान्त कोठडींत प्रवेश करितांना हरिभय्या स्वतःशींच म्हणाला, " न पाहिलेल्या मशिनगनचा प्रभाव दिसतो हा ! "

आणि, कोठडींतील थंड चौथऱ्यावर आपलें थकलेलें शरीर टाकतांना, त्या उद्वेगजनक स्थितींतही त्याला मनापासून हंसूं आलें.

ज्योत्स्ना, जून १९३६



## देऊळ आणि दर्गा

त्या देवळापासून एका हांकेच्या अंतरावर तो दर्गा होता.

सूर्यास्तानंतर फिरून परत येतांना त्या दर्ग्यापाशीं थोडा वेळ तरी बसण्याचा माझा रोजचा नेम होता. वास्तविक त्या दर्ग्यांत विशेष असें कांहीं नव्हतें. पण, नदीकांठच्या त्या काळ्याभोर शेतजमिनींत वारंवार सफेती देऊन कायम ठेवलेलें त्याचें तें शुभ्रपण निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या प्रकारांनीं मनाला आकृष्ट करित असे. काळोख्या रात्रीं तो दर्गा म्हणजे त्या स्मशानभूमीनें जगाच्या नश्वरतेकडे बघून केलेलें उपरोधिक हास्यच आहे असें वाटे; व चांदण्या रात्रीं त्याच्याकडे पाहिल्यावर, कुंदाच्या फुलांची रासच जणुं कोणी समोरच्या देवळांतील महादेवाची पूजा बांधण्यासाठीं तिथें घालून ठेवली आहे, असा भास होत असे.

पण, मला त्या दर्ग्याविषयीं आकर्षण वाटे, तें केवळ त्याच्या शुभ्रपणामुळें मात्र नव्हे. त्या दर्ग्याला ओठंगून बसलें, म्हणजे समोरचें महादेवाचें देऊळ डोळे भरून पहावयाला मिळे; व त्यामुळेंच मला त्या दर्ग्यापाशीं बसण्याची इतकी उत्कट इच्छा होई. देऊळ लहानसेंच होतें. पण, त्याचा खालचा भाग तांबूस पाषाणांनीं बांधलेला असून, त्यावरील नक्षीकाम अप्रतिम होतें. त्याचा घुमट मात्र पांढऱ्या पाषाणांनीं बांधलेला आणि अष्टकोनी होता. सूर्याच्या रखरखीत प्रकाशांत सामान्यतः कोणत्याहि वस्तूचें सौन्दर्य कोमेजून जातें. पण, तो सुंदर घुमट उन्हामध्यें, उमलण्याच्या अगदीं बेतांत असलेल्या, कमळाच्या फुगीर कळीप्रमाणें दिसत असे. आणि, आकाशाच्या नील पार्श्वभूमीवर, चंद्र किंवा शुक्र तळपत असतांना, त्याची जी कांहीं शोभा दिसे, ती खरोखरीच अवर्णनीय होती. तो घुमट म्हणजे जणूं कांहीं तांब्याच्या संपुष्टांत ठेवलेला

तेजस्वी शिवबाण होता; व त्याच्या पार्श्वभागीं झळकणारा तो चंद्र आणि तीं नक्षत्रें म्हणजे जणूं कांहीं त्याला वाहिलेलीं स्वर्गीय पुष्पें होतीं.

त्या जागेला मी स्मशान म्हटलें खरें. पण वास्तविक ती कांहीं स्मशान-भूमि नव्हती. त्या गांवच्या मालगुजाराचा बागबंगला नदीकांठीं होता; व त्याच्या भोंवतालीं असलेल्या या विस्तीर्ण बगीचांत त्याच्या घराण्यांतल्या कांहीं व्यक्तींच्या समाधी बांधलेल्या होत्या. नदीच्या कांठीं उभें राहिलें, म्हणजे प्रथम तो दुमजली पडका बंगला, नंतर तें महादेवाचें देऊळ आणि शेवटीं हा चिमुकला दर्गा दृष्टीस पडत असे. तो बगला उघडला गेलेला मी किती तरी वर्षांत पाहिला नव्हता. पण, तें महादेवाचें देऊळ मात्र दर सोमवारीं उघडलें आणि झाडलें जाऊन आंतील शिवलिंगावर बेलफुलें वाहिलीं जात असत; व त्या दर्ग्यावरहि दर शुक्रवारीं, वर जरतारी फुलें असलेली पण किंचित् विटलेली, हिरवी चादर घातलेली दिसत असे. जिवंत माणसांना रहाण्यासाठीं बांधलेल्या त्या बंगल्याची आब कोणी टेवली नव्हती. पण, त्या मृतांच्या विश्रांतिस्थानांची निगा मात्र, आठवड्यांतून एकदा का होईना, नेमानें घेतली जात असे.

त्या दर्ग्याला ओठंगून बसलें, म्हणजे पुष्कळदां माझ्या मनांत असा विचार येत असे कीं, हा दर्गा, हें देऊळ आणि हा बंगला यांच्यांत कांहीं संबध असेल का? किंवा केवळ यदृच्छेनें तीं या एका जागेंत बांधलीं गेलीं आहेत!

त्या दिवशीं चतुर्दशीची रात्र असल्यामुळें मी मुद्दामच उशिरां फिरा-वयाला गेलों होतों. मी परत गांवाकडे यावयाला निघालों, त्या वेळीं दहा वाजून गेल होते. चतुर्दशीच्या त्या शुभ्र चांदण्यांत नदीच्या आटत चाललेल्या पात्रांतील वाहत्या पाण्याचा वेडावांकडा रोड प्रवाह भयाणपणानें चमकत होता. त्या पाण्याची क्षीण खळखळ, नदीकांठच्या बेडकांचा तार स्वर व मधूनच कानांवर पडणारी कोल्ह्यांची हुकी यांमुळें होणारा शांततेचा भंग म्हणजे जणुं कांहीं त्या भयानकतेचें रुदनच होतें. कुंभारांनीं भट्टीसाठीं कोरड्या पात्रांत जागोजाग केलेला जाळ चितेसारखा वाटत होता. आणि काळ्याभोर शेत-जमिनींत गेलेल्या पांढऱ्या पाऊलवाटा सर्पांच्या कातींसारख्या दिसत होत्या.

नदी उतरून मी पलीकडे आलों आणि माझे पाय आपोआप त्या दर्ग्याकडे वळले. जणुं कांहीं, त्या बाजूनें येणाऱ्या वाऱ्याच्या झुळकेबरोबर आलेल्या सब्जाच्या उन्मादक गंधानें माझ्या मनाला तिकडे ओढून नेलें. मी त्या दर्ग्याजवळ आलों व त्याला टेंकून खालीं बसलों. त्याबरोबर दंवानें ओलावलेल्या गवताचा गारवा माझ्या शरीराला जाणवला. आणि, त्या दर्ग्यावर डोकें टेंकतांच, त्याच्या थंडाव्यामुळें माझ्या शिणलेल्या डोळयांवर सुस्ती येत आहे, असें मला वाटलें. तें महादेवाचें देऊळ व त्याच्या पलिकडचा तो पडका बंगला माझ्या पेंगलेल्या डोळयांना दिसत होता;—नव्हे, आपल्या शुभ्रतेनें चंद्रप्रकाशाला लाजविणाऱ्या शिवमंदिराच्या त्या रम्य घुमटावर माझी दृष्टि स्थिरावली. आणि, त्या स्थितींतच, कोण जाणें केव्हां, माझा डोळा लागला.

पण डोळा लागला म्हणण्यापेक्षां तो उघडला म्हणणेंच जास्त समर्पक होईल. कारण, माझे डोळे निद्राधीन होऊन मिटतात न मिटतात, तोंच आपल्यापुढें हिरवी कफनी घातलेला एक तरुण देखणा फकीर उभा आहे, असें माझ्या दृष्टीस पडलें. त्याला बघितल्यावर मला नवल वाटलें तें या गोष्टींचें कीं, त्याच्या हातांत रुद्राक्षांची स्मरणी होती व तो ' नमः शिवाय ' असे शब्द तोंडानें उच्चारीत होता.

पण याहिपेक्षां आश्चर्यकारक गोष्ट नंतर घडली. मी त्याला कांहीं विचारणार, तोंच तो मला म्हणाला—

" चल, आपण त्या महादेवाच्या देवळांत जाऊं या. आज सोमवार असल्यामुळें—"

" तुझ्यासारख्या फकिराला देवळांत कसं जातां येईल ?" मी त्याला विचारलें.

" कां बरं ? गेलीं तीस वर्षं मी नेमानं दर सोमवारीं या महादेवाचं दर्शन घेत असतों. त्याचं दर्शन घेण्याचा जितका हक्क मला आहे, तितका या गांवांत दुसऱ्या कोणालाहि नसेल. हा दर्गा, तें देऊळ आणि तो बंगला यांचा खरा वारसदार मी आहे—"

" पण तूं फकीर–मुसलमान. त्या देवळांत कसा जाणार ? "

" कुणी सांगितलं तुला मी मुसलमान आहें म्हणून ? "

" तुझ्या वेषावरून माझी कल्पना झाली तशी--"

" तुझी कल्पना कांहीं अगदींच चूक नाहीं. या दर्ग्याखालीं ज्यांनीं मला आणून पुरलं, त्यांची भावना मी मुसलमान आहे अशीच होती—"

" मग खरोखरी तूं कोण आहेस ? तुझ्यावर हा दर्गा कोणी बांधला ? आणि या शिवमंदिराशीं तुझा काय संबंध ?—"

" या गांवचे मालगुजार रायसाहेब हरप्रसाद चतुर्वेदी यांचं नांव तुला माहितच असेल. त्यांना त्यांच्या मुसलमान राणीपासून झालेला मुलगा मी. त्या पलिकडच्या बंगल्यांत माझा जन्म झाला, माझं आयुष्य गेलं, माझ्या आईचा अंत झाला—"

" तो बंगला म्हणजे रायसाहेबांचं विलासमंदिर होतं म्हणायचं मग ?–"

" होय. आणि हें स्मशान म्हणजे एके काळीं त्या बंगल्याभोवतालचा बगीचा होता. माझ्या आईचा खून ज्या दिवशीं त्या बंगल्यांत झाला—"

" तुझ्या आईचा खून ! आणि तो कोणी केला—"

" रायसाहेबांनीं–खुद्द माझ्या वडिलांनींच केला--"

" तो काय म्हणून ? "

" त्यांचं माझ्यावर अत्यंत प्रेम होतं. त्या प्रेमापायीं त्यांनीं आईचा खून केला माझ्या--"

" मुलाच्या प्रेमासाठीं त्याच्या आईचा खून !–आपल्या प्रियकरिणीचा खून ? "

" होय.—पण त्यांत एवढं आश्चर्य वाटण्यासारखं कांहीं नाहीं. माझ्या वडिलांनीं एकामागून एक तीन हिंदु राण्या केल्या. पण त्यांना संतति झाली नाहीं. माझी आई ही कांहीं त्यांची लग्नाची बायको नव्हे. ते काश्मीरला गेले असतां तिथें त्यांनीं माझ्या आईला विकत घेतली; न् या बंगल्यांत तिला आणून ठेवली. ती इथं रहायला आल्यावर वर्षाच्या आंतच माझा जन्म झाला. माझ्या

आईच्या सौंदर्यावर रायसाहेब अत्यंत लुब्ध होते. माझ्या जन्मामुळें त्यांचा तिच्या-वरील लोभ अधिकच वाढला--''

" आणि तरी त्यांनीं खून केला तिचा ! "

" कारण तिच्याहिपेक्षां माझ्यावर जास्त प्रेम होतं त्यांचं. त्यांच्या विलासी मनाला लागलेली पुत्रमुख पाहण्याची तळमळ तिच्यामुळें तृप्त झाली होती. म्हणून त्यांना तिच्याविषयीं विशेष प्रकारचं कौतुक वाटत असे, हें खरं; पण त्याबरोबरच ती मुसलमान असल्याबद्दल त्यांना हळहळहि वाटे. तिच्यासारख्या मुसलमान स्त्रीपासून आपल्याला झालेला मुलगा !--तो आपल्या बीजाचा न् रक्ताचा असला तरी ब्राम्हण गणला जाणार नाहीं;—फार काय, त्याला हिंदु सुद्धां म्हणतां येणार नाहीं आणि आपली सारी प्रचंड संपत्ति अखेर दत्तकाच्या हातीं जाईल या गोष्टीचं त्यांना मनस्वी दुःख वाटत असे. तो एक त्यांना हृद्रोगच होऊन बसला. शेवटीं माझी आई ही मुसलमान नसून शीख आहे, असें भासवा-यायला त्यांनीं सुरवात केली. हें त्यांचं वर्तन तिला खपलं नाहीं. आपल्या आई-बापांच्या गरीबीचा फायदा घेऊन त्यांनीं आपल्याला विकत घेतलं हें ती विसरली नव्हती. त्यांच्या संपत्तीचा उपभोग घेत असतांनाहि त्यांच्याविषयीं एक प्रकारची शिसारी तिच्या मनांत वागत असे. त्यामुळं मी जसजसा मोठा होत गेलों, तसतसं त्या दोघांचं बिनसत गेलं. रायसाहेबांना अशी एक आशा होती कीं, माझी आई शीख असल्याबद्दल जर लोकांचा आपण पक्का समज करून दिला, तर पैशाच्या जोरावर कांहीं तरी शास्त्राधार काढून आपल्याला आपल्या मुलाला दत्तक घेतां येईल, आपल्या घराण्याचा न् संपत्तीचा वारसा त्याला मिळवून देतां येईल.पण आई त्यांच्या या कल्पनेची नेहमीं थट्टा करीत असे. अखेर माझी सुंता करण्याचा हट्ट जेव्हां तिनं धरला, तेव्हां तो विधि न करण्याबद्दल त्यांनीं परोपरीनं तिची समजूत घालून पाहिली. पण तिनं कांहीं आपला हट्ट सोडला नाहीं. उलट ती एक दिवस त्यांना उपहासानं म्हणाली, "तुम्ही कितीहि प्रयत्न केलात, तरी तुम्हांला कांहीं माझ्या मुलाला बम्मन बनवतां येणार नाहीं. मग उगाच त्याच्या सुंतेच्या आड कां येतां ? तुमच्या जिंदगीचा तो वारस

व्हावा अशी जर खरोखरीच तुमची इच्छा असेल, तर त्याला हिंदु ठरवण्याचा प्रयत्न करण्याऐवजीं तुम्हींच का नाहीं स्वतः मुसलमान होत ? " या तिच्या खिजवण्यामुळं रायसाहेब भयंकर संतापले न् त्यांनीं बंदूक चालवून तिथल्या तिथं तिचा खून केला."

" आणि या प्रकाराचा बोभाटा नाहीं झाला कांहीं ? "

" कसा होणार ? रायसाहेब या गांवाचे मालगुजार, पहिल्या वर्गाचे ऑनररी मॅजिस्ट्रेट आणि या भागांतले अव्वल दर्जाचे रैस होते. शिवाय हा गांवाबाहेर असलेला बंगला ! आमच्या दिमतीला असलेल्या नोकरांनीं तो अघोर प्रकार पाहिला; पण रायसाहेब,पुढं बोलण्याची प्राज्ञा नव्हती त्यांची. माझी आई गोळी लागून खालीं पडल्यावर रायसाहेबांना फार पस्तावा झाला आपल्या कृत्याचा; व तिच्या रक्तबंबाळ प्रेतावर अंग टाकून त्यांनीं किती वेळ तरी शोक केला. अखेर, त्यांच्या दिवाणजींनीं त्यांची समजूत घातली; प्रेत फार वेळ तसं राहूं देण्यांत असलेला धोका त्यांच्या नजरेस आणून दिला; व बंगल्याच्या मागच्या बाजूला असलेल्या बागेंत रातोरात माझ्या आईचें दफन केलं. त्या जागेवर रायसाहेबांनीं पुढं आपल्या हातांनीं बकुळीचं झाड लावलं—"

" मग तुझी सुंता झाली कीं नाहीं ? "

" नाहीं. तो योग नंतर आलाच नाहीं. त्या दिवशीं रात्रीं आईच्या मरणाचं तें जें भयंकर दृश्य मी बघितलं त्याचा परिणाम माझ्या मनावर फार चमत्कारिक झाला. त्या वेळीं मला आलेल्या मूर्च्छेतून मी दुसऱ्या दिवशीं दुपारीं सावध झालों; व नंतर मला वारंवार तो प्रकार डोळयांपुढें दिसून अपस्माराचे झटके येऊं लागले. मला बरा करण्यासाठीं रायसाहेबांनीं पाण्यासारखा पैसा खर्च केला, पण त्यांना यश आलं नाहीं. आणि अखेर, कोणत्याच धर्माचा संस्कार माझ्यावर न होतां, मी हें जग सोडलं—"

" मग तुझ्यावर हें थडगं कोणी बांधलं ? "

" रायसाहेबांनींच. माझ्या मृत्युनंतर, वस्तुतः मी मुसलमान नसतांनाहि

केवळ आईच्या इच्छेला मान देण्यासाठीं, त्यांनीं हा दर्गा माझ्यावर बांधला; व त्याची निगा ठेवण्यासाठीं गावांतल्या एका मुसलमानाला इनामहि करून दिलें—

" आणि हें महादेवाचं मंदिर ? "

" ही त्यांची स्वतःची समाधि आहे. आपल्या समाधिसाठीं ही जागा त्यांनीं स्वतःच पसंत केली; व तीहि या उद्देशानं कीं, त्या मंदिराच्या गाभाऱ्यांत बसणाराच्या हा दर्गा सतत दृष्टीस पडावा. तसेंच, त्यांनीं दुसरी अशी व्यवस्था केली कीं माझ्या आईच्या दफनाच्या जागेवर लावलेल्या बकुळीचीं फुलं दर सोमवारीं या मंदिरांतील महादेवाला वाहिलीं जावींत—"

" पण हा दर्गा न् तें देऊळ इतक्या सुस्थितींत असतां तो बंगलाच कां पडायला लागला आहे ?—"

" त्याचं कारण त्या बंगल्यांत माझी आई न् मी वावरत असतों, अशी रायसाहेबांच्या वारसांची समजूत ! त्या भीतीनं त्यांनीं तो बंगला टाकून दिला आहे. मग ऊठ आतां ! आपण बंगल्याच्या मागें जाऊन बकुळीची फुलं आणूं न् मग महादेवाचं दर्शन घेऊं. आतां तर तुझी हरकत नाहीं ना मला देवळांत जाऊं द्यायला ?—"

—तो हंसून म्हणाला.

मी लगेच उठलें व त्याच्या मागोमाग त्या बकुळीच्या झाडाकडे गेलें.

तिथें फुलांचा नुसता खच पडला होता. तो त्यांतलीं फुलें वेंचीत असतां मी त्याला म्हटलें, " तुझ्या आईचं जर रायसाहेबांवर प्रेम नव्हतं, तर तिच्या थडग्यावर वाढलेल्या या बकुळीचीं फुलं त्यांच्या समाधीवर वहाण्यांत काय अर्थ आहे ? "

" तिचं त्यांच्यावर प्रेम नसलं म्हणून काय झालं ? त्यांचं तर तिच्यावर प्रेम होतं ना ? प्रेमाचा व्यवहार हा जगांत नेहमीं एकतर्फीच असतो बहुतेक–"

आणि आम्ही शिवमंदिरांत आलों.

त्यानें आपल्या ओंजळींतील बेलफुलें शिवलिंगाला वाहिलीं व तोंडानें शिवनामाचा घोष करीत गाभाऱ्यांतील घंटेला हात घातला.

त्या घंटेच्या आवाजाबरोबर मी दचकून जागा झालों.

आणि गांवाच्या शिवेवर असलेल्या दत्तमंदिरांतील शेजारतीच्या घंटेचे गोड निनाद माझ्या कानांवर पडले.

ज्योत्स्ना, एप्रिल १९३७



## अंगें भिजलीं जलधारांनीं

केव्हां एकदां पाऊस सुरू होईल असें वाटत होतें सारखें !

आभाळ अगदीं गच्च भरून आलें होतें. सूर्य नुकताच मावळला होता. पण क्षितिजावर त्याच्या अस्ताची एकहि खूण शिल्लक उरली नव्हती. नैॠत्येच्या कोपऱ्यांत अस्ताव्यस्त पसरलेल्या एका काळ्याभोर ढगाच्या अंगावर वीज वेगानें चमकत होती. आणि, आईच्या कडेवर बसलेल्या लहानग्यानें आपलीं चिमुकलीं बोटें हलवून ये ये करावें, त्याप्रमाणें झाडांच्या पानांचे शेंड्यालगतचे झुबके एक प्रकारच्या आतुरतेनें आकाशांत चुळबुळ करित होते.

अखेर एकदम जोराचा गडगडाट झाला व पावसाचे मोठमोठे थेंब जमिनीवर पडले. वाऱ्याचा सोसाटाहि लगेच सुरू झाला. पण, जमीन अद्याप थोडीसुद्धां भिजलेली नसल्यामुळें, चोहों बाजूंनीं धुळीचे लोट उभे करून, वारा रस्त्यांतून गिरक्या घेत घोंघावत होता. त्यामुळें घाईघाईनें उघडलेल्या छत्र्या उलटल्या व डोळे धुळीनें भरून जाऊन समोरचें दिसेनासें झालें.

त्या वाऱ्यामुळें जरी ढगांची पांगापांग झाली नाहीं, तरी आठवडी बाजारांत जमलेल्या माणसांची मात्र अगदीं दाणादाण उडाली. वाऱ्यानें पाऊस उडून जाईल, अशी आशा एका क्षणीं वाटे; तर लगेच दुसऱ्या क्षणीं अशी भीति वाटे, कीं वारा आणि पाऊस हे दोघे मिळून आपल्याला अगदीं झोडपून काढतील. म्हणून दुकानदारांनीं घाईघाईनें पालें आंवरलीं; गाड्यांतून कसाबसा माल भरला; पाटीवाल्या बायांची गलबल सुरू झाली; व बर्डीच्या दोन्ही रस्त्यांतून माणसांचा गढूळ ओघ वेगानें वाहूं लागला.

मीहि त्या ओघाबरोबर शहराच्या रस्त्याला लागलों. हपिसांत आठ तास रखडून शिणलेलें माझें शरीर, जणुं कांहीं त्या ओघाच्या वेगानें, आपोआप पुढें ढकललें जात होतें.

नीडहॅम पार्कच्या समोर मी आलों, तों पाऊस जोरानें पडूं लागला. वाऱ्याच्या सोसाट्याबरोबर होणारा त्याचा तिरपा मारा चुकवावा, म्हणून मीं छत्री कलती केली; व झपाझप पावलें टाकूं लागलों. पण पाऊस इतक्या झपाट्यानें पडत होता कीं, माझ्या धोतराचे वर केलेले सोगे ओले होऊन गेले; व मला वाटलें कीं, मी जर असाच हट्टानें चालत राहिलों, तर लवकरच माझे सारे कपडे भिजून जातील.

पण टांगा करण्याची तर मुळींच सोय नव्हती. जो एकादा दुसरा टांगा रस्त्यानें भेटे, तो महालांत जावयाला रुपया सांगत होता. शिवाय टांग्यांत बसूनहि पावसाचा मारा चुकवितां आला असता असें थोडेंच आहे ? म्हणून मी तसाच धीरानें पुढें चाललों.

तोंच वीज इतक्या जोरानें कडाडली कीं, आकाश आपल्या अंगावर कोसळून पडतें कीं काय, असें मला वाटलें; व आतां पुढें जाण्यांत अर्थ नाहीं, असा विचार मनांत येऊन मी आजूबाजूला बघितलें. तेव्हां गिरणीचे पिवळे दिवे माझ्या दृष्टीस पडले. त्या बरोबर तिच्या उघड्या फाटकांतून मी धांवतच आंत घुसलों.

पावसाच्या तडाक्यांत सांपडलेले माझ्यासारखे बरेच लोक आसऱ्यासाठीं माझ्या आधींच तिथें येऊन पोंचले होते; व फाटकाच्या डाव्या बाजूला असलेल्या टाइमकीपरच्या कचेरीची ओंवरी त्यांनीं काबीज केली होती. " परवानगीशिवाय आंत येऊं नये " अशी पाटी दारावर लागली असतांना आम्ही आंत आलों याचें जसें त्या वेळीं मला नवल वाटलें नाहीं, त्याचप्रमाणें दाराच्या उजव्या बाजूला उभ्या असलेल्या दारवानाच्याहि मनांत आम्हांला बाहेर काढून देण्याचा विचार त्या वेळीं आला नाहीं !

कारण पाऊस मुसळधार पडत होता.

आणि त्या वृष्टींत, समान संकटाच्या वेळीं एकमेकांविषयीं उत्पन्न होणाऱ्या अनुकंपेशिवाय, इतर सर्व भावना लुप्त होऊन गेल्या होत्या.

ओसरींत आल्यावर मी धोतराचे सोगे पिळले; व छत्रीच्या काड्यांतून

पाघळून तोंडावर ठिबकलेले पाण्याचे थेंब रुमालानें पुसून, वारा लागून घशाला आलेला गारवा घालविण्यासाठीं, खिशांतून सिगारेट बाहेर काढली. ती मी शिलगावणार, तोंच माझ्या कानांवर मृच्छकटिकांतील गाण्याचे पुढील बदसूर आले—

अंगें भिजलीं जलधारांनीं
ऐशा ललना स्वयें येउनी
देती आलिंगन ज्यां धांवुनि
तेच्चि पुरुष दैवाचे !
धन्य धन्य जगिं साचे !

त्याबरोबर मी इतका दचकलों कीं, माझ्या हातांतील सिगारेट खालीं पडली; व हा चारुदत्त कोण आहे, हें जाणून घेण्यासाठीं मी उत्कंठेनें एकदम मागें वळून पाहिलें.

तों टाईमकीपरच्या कचेरींतील कपाटाशीं उभा राहून त्यांतील खुराड्यां-तून टेवलेले कामगारांच्या हजेरीचे तक्ते चाळीत असलेला एक किरकोळ कार-कून माझ्या दृष्टीस पडला. त्या जवानाचें सुरकुतलेलें तोंड गुळगुळीत होतें; त्याच्या पिचक्या डोळ्यांवर चष्मा चढलेला होता; क्वचित् पांढुरके झालेले राठ केंस त्यानें चापचोपून बसविलेले होते आणि ते तक्ते चाळतांना तो तोंडानें सारखे त्या पदाचे वेडेवांकडे आलाप घेत होता.

त्याचें तें ध्यान पाहून मला वाटलें, पट्ठा गिरणींत रोज दहा तास रात्रीं-अपरात्रीं राबत असला, तरी त्याची रसिकता अगदीं रसरशीत जिवंत आहे ! शिवाय केशवसुतांनीं म्हटलेंच आहे कीं, “ गाण्यानें श्रम होति सर्व हलके—”

त्याच्या जवळच्या खुर्चीवर दुसरा एक कारकून, पाऊस केव्हां एकदांचा कमी होतो, याची वाट पहात बसला होता. त्याचें शरीर कपड्यांत मावत नव्हतें; व डोळे गालांच्या गुरोळींत गडप झाले होते. त्याची कामाची पाळी नुकतीच संपली होती; व या दुसऱ्या जवानाची सुरू झाली होती. त्याचे किलकिले डोळे खिडकींतून मोठ्या उत्कंठेनें सारखे बाहेर बघत होते.

पण बाहेर पागोळ्या जोरानें पडत होत्या आणि आंत त्याच्या सहकाऱ्याचें बेसूर गाणें धडाक्यानें चालू होतें.

शेवटीं तो त्रासून उद्गारला, "बस कर रे बुवा! तूं कितीहि कोकललास, तरी कोणतीहि वसंतसेना इथं येऊन तुझ्या गळ्यांत पडायची नाहीं! उगाच कंठशोष करून डोकं का उठवतोस दुसऱ्याचं?—"

"पाळी सरली म्हणून तुझ्या गमजा या लेका! तूं स्वतः जेव्हां कोकलत असतोस तेव्हां रे? तुझं ठीकच आहे!--घरीं गेल्यावर सारी ऊबच ऊब--"

"तुला लग्न करायला नको कुणीं म्हटलं होतं? पण तुला टाईम मांडतां मांडतां डोळे मारायला हवेत फुकटचे!—"

"लेका, नाकानं कांदे नको सोलूंस उगाच! लग्न झाल्यापासून भारी सभ्यपणा आठवलाय् तुला! गेल्या वर्षी याच दिवसांत त्या गोजेरवरून तुझी न् त्या जागोबाची--"

"गप गप!—तुला कांहीं काळ वेळ समजतो का नाहीं? बाहेर बघ ओसरींत गोळा झालेले आपले सारे काकेमामे टकमकां पहाताहेत आपल्याकडे—"

ते शब्द ऐकतांच मी तोंड फिरविलें. कारण माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचेंच लक्ष त्या दोघांच्या संभाषणाकडे नव्हतें. त्यांच्या डोळ्यांना आणि कानांना फक्त पागोळ्या जाणवत होत्या.

त्या लठ्ठ कारकुनाचे ते उद्गार ऐकून त्या रोड कारकुनाला अगदीं हिसाळा आल्यासारखा झाला; व तो एकदम ओरडून म्हणाला; "हे चौकीदार सारे गेले कुठे? ही काय मिल आहे कीं धर्मशाळा! फाटक सताड उघडं ठेवून इतके लोक यांनीं येऊं कसे दिले आंत?"

आणि ते दोघे दणदणतच बाहेर आले.

त्याबरोबर स्नो, सेंट, पोमेड वगैरे किती तरी अंगरागांच्या सुवासाच्या सूक्ष्म लाटा माझ्या अंगावर येऊन आदळल्या.

थोड्याच वेळांत चौकीदारांनीं ओसरी बहुतेक रिकामी केली व गिरणीचें फाटक लावून घेतलें.

मी एकटा तेवढा ओसरींत उभा राहून पाऊस कमी होण्याची वाट पहात होतों. माझ्या अंगावरील कोशाच्या कपड्यांनीं मला तिथें उभें रहाण्याची सवलत मिळवून दिली होती. पण आतां तिथें थांबण्यांत मौज उरली नव्हती. तो दुसरा कारकून पावसाची परवा न करतां मघाशींच निघून गेला होता. आणि, आंतून जरी गाण्याचे सूर सारखे येत होते, तरी तिथें एकट्यानें उभें रहाण्याचा मला अगदीं कंटाळा आला होता, इतक्यांत गिरणीच्या फाटकाचा करकर असा आवाज झाला; व वार्द्धक्यानें वांकलेली एक भिकारीण काठी टेकीत टेकीत आंत शिरली.

चौकीदार पलिकडच्या बाजूला चिलीम पेटवून दम मारीत होते. त्यांच्या लक्षांत तिचें आगमन आलें नाहीं.

ती ओसरींत येऊन एका कोंपऱ्यांत बसली; व आपल्या अंगावरील फाटकें भिजलेलें पोतें तिनें बाजूला ठेवलें. तोंच तिला खोकल्याची जोरानें उबळ आली. ती इतकी कीं, खोकल्यामुळें हादरणारें तिचें जर्जर शरीर पाहून मला, खोकतां खोकतांच तिचा जीव जातो कीं काय, असें भय वाटलें.

म्हणून मी तिच्या जवळ जाऊन तिच्याशीं कांहीं बोलणार, तोंच विजेच्या कडकडाटासारखे रागाऊन उच्चारलेले शब्द माझ्या कानांवर आदळले—

" चौकीदार, कोण खोकून राह्यलंय मघापासून बाहेर सारखं ? तुम्हीं फाटक नीट लावलं नाहींत. हे लोक कामसुद्धां करूं देत नाहींत जरा स्वस्थपणानं—"

आणि, " अंगें भिजलीं जलधारांनीं " हें कडवें तोंडानें बडबडत तो जवान लुकडा तणतणतच बाहेर आला.

पण म्हातारीचा खोकला आतां थांबला होता; व थकल्यामुळें गुढघ्यावर मान ठेवून ती निपचित बसली होती.

तिला पाहतांच त्याचें तरुण रक्त खवळलें व तो खसकन ओरडून म्हणाला, " निकालो यहांसे !—"

म्हातारीनें डोकें उचलून एकवार वर पाहिलें, पण ती जागची हलली मात्र

नाहीं. कदाचित् हालचाल करण्याइतकें त्राणहि तिच्या शरीरांत त्या वेळीं उरलेलें नसावें.

तितक्यांत चौकीदारहि धांवत तेथें आले. त्यांच्यापैकीं एकानें तिचें पोतें बाहेर फेंकलें व दुसऱ्यानें तिची बकोटी धरून तिला फरफरां ओढीत फाटकाबाहेर ढकललें.

तिला अशा रीतीनें बाहेर काढल्यावर तो जवान आंत गेला व पुन्हा माझ्या कानावर शब्द आले—

अंगें भिजलीं जलधारांनीं !

पण मला ते सूर आतां ऐकवेनात. मी तसाच तडाक्यानें, छत्री उघडल्याशिवाय, पावसाचा मार खात फाटक उघडून बाहेर पडलों.

फाटकाच्या समोर असलेल्या विजेच्या दिव्याच्या खांबाला टेंकून ती म्हातारी उभी होती.

आणि तिच्या लटलट कांपणाऱ्या अंगावरून पाण्याच्या धारा सारख्या निथळत होत्या.

—सत्यकथा, ऑगस्ट १९३६



# नृत्यांगना

रायबहादुरांनीं ज्या वेळीं दिवाणखान्यांत प्रवेश केला, त्या वेळीं नृत्याला नुकतीच सुरवात झाली होती.

मध्यरात्रीचा सुमार होता. दिवाणखान्याच्या मधोमध घातलेल्या सुंदर गालिचावर मेहताबचीं नाजुक, आरक्त पाऊलें तालाच्या ठेक्यावर पडत होतीं. तिच्या दोहों बाजूंना शहरांतील प्रमुख शोकीन नागरिक आणि अधिकारी लोडांना रेलून किंचित् अस्ताव्यस्त बसले होते. सिगारेट, अत्तर आणि मद्य यांच्या संमिश्र गंधाचा दरवळ दिवाणखान्यांत पसरला होता.

पण मेहताबच्या चेहऱ्यावर मात्र त्या विलासी वातावरणाला सर्वथैव विसंगत अशी नाराजीची सूक्ष्म छटा उमटली होती. तिच्या त्या काळ्याभोर, विशाळ नेत्रांत कलाविलासाचा उन्माद नव्हता; तर त्यांत खेळणारी असहाय रोषाची चमक जणुं कांहीं असें सांगत होती कीं, हें नृत्यच काय, पण हा साराच जीवनक्रम माझ्या इच्छेविरुद्ध मजवर लादण्यांत आला आहे. वास्तविक त्या दिवशीं निव्वळ गाण्याचा कार्यक्रम ठरलेला होता; व त्याप्रमाणें तासभर तिचें गाणें झालेंहि. पण, सरदार प्रतापराव शितोळे यांनीं नंतर फारच गळ घातल्या-मुळें, तिला स्वतःच्या इच्छेविरुद्ध आतां नृत्याला उभें रहावें लागलें होतें.

पण, तिला राग आला, तो सरदारसाहेबांचा नव्हे; त्यांच्यापेक्षां तिथें जमलेल्या शोकीन शिष्टांचा व त्याहूनही आपल्या आबाजानचा तिला जास्त राग आला. तिनें दोन तीन राग म्हटल्यावर खा. ब. अबदुल करीमखान यांनीं तिला कवाली चिजा म्हणण्याचा अतिशय आग्रह केला; व त्या आग्रहाची री मैफलींतील इतरहि रसिकांनीं ओढली. एवढ्यावरच भागलें नाहीं. त्यांच्या आग्रहानुसार ती गजल म्हणत असतां, खानबहादुरांनीं मधून मधून तिच्यावर साभिप्राय कटाक्ष आणि शृंगारिक सवाल–जबाब फेंकावयाला सुरवांत केली. त्यांच्या त्या अतिप्रसं-

ग्याचा मेहताबला फार संताप आला. पण, इथें चिडून निभण्यासारखें नाहीं याची तिला जाणीव असल्यामुळें, तिनें त्यांच्या मार्मिक सवालांना मर्मभेदक जबाब देऊन पुष्कळदां मोठ्या चतुराईनें त्यांच्यावर बाजू उलटविली.

कारण, आबाजाननें तिला आरंभींच इषारा दिला होता कीं, खानबहादुरांना दुखवून आपलें चालणार नाहीं. किती झालें तरी ते सिटी मॅजिस्ट्रेट होते !

त्यामुळें, त्यांच्या उत्तान सवालानें मेहताबला राग आला आहे असें दिसलें, म्हणजे आबाजान सारंगीवर गज फिरवितां फिरवितांच तिला समस्यापूर्तीची सूचना देत असे. खानबहादुरांच्या तीक्ष्ण नजरेंतून ही गोष्ट सुटली नाहीं. आणि त्यांच्या एका सवालाला मेहताबच्या ऐवजीं तिच्या मागें बसलेल्या त्या सारंगियानें जबाब दिला असतां खानबहादुर उद्गारले, "वाहवा महबूब मिया ! आपली दाढी पांढरी सफेत झालेली असली, तरी आपला जबाब आपल्या हिरव्या जरतारी जाकिटाला शोभेसाच आहे ! "

आणि, हा सारा प्रकार चालला असतांनाच जेव्हां प्रतापरावांनीं तिला नृत्य करण्याचा आग्रह केला, तेव्हां, आश्चर्याची गोष्ट ही कीं, आबाजाननें त्या आग्रहाला मोठ्या आर्जवी शब्दांनीं भर दिली.

तिला कळेना, आज म्हाताऱ्याच्या मनांत कोणतें पाप आहे तें !

मेहताबच्या नृत्यनैपुण्याचा लौकिक सर्व हिंदुस्थानभर पसरलेला होता. विशेषतः कलकत्त्याच्या एका फिल्म कंपनीनें आपल्या बोलपटांत तिच्या नृत्याचा अंतर्भाव केल्यापासून तर, तिला नुसत्या गायनाचे जलसे करणें अशक्य होत चाललें होतें. पण, गाण्याच्या बाबतींत चुकूनहि कधीं आढेवेढे न घेणारी मेहताब नृत्याच्या बाबतींत मात्र, एखाद्या छांदिष्ट मुलासारखी, लहरी, रुसरी आणि अडेल होती. तिची अशी एक भावना होऊन गेली होती कीं, एका विशिष्ट मनःस्थितींत असतांना आपण नृत्य केलें, तरच आपलें त्या कलेंतील प्रावीण्य पूर्णतेनें प्रकट होतें. त्यामुळें तिनें चित्रपट कंपनीला सुद्धां आपल्या कामाच्या बाबतींत फार छळलें होतें.

आणि आज तर तिचें मन अनेक कारणांमुळें अत्यंत अस्वस्थ, अत्यंत बेचैन झालेलें होतें.

कदाचित् आबाजानचा शब्दहि तिनें जुमानला नसता. पण प्रतापरावांचा शब्द--त्या शब्दांत असा कांहीं जिव्हाळा होता कीं, अतिशय नाराजीनें का होईना, मेहताब अखेरं नृत्याला उभी राहिली.

पण तिच्या डाव्या भुंवईवर पडलेली बारीक अढी, किंचित् आंत मुरडून दबलेला अधरोष्ठ आणि हालचालींतील विभ्रमाचा अभाव तिची नाराजी स्पष्ट दर्शवीत होता.

तरीसुद्धां, आपल्या कांतीनें गुलाबाच्या फुलांना लाजविणारीं तिचीं पाउलें तालावर पडूं लागून, तिचे मोहक हावभाव सुरू होतांच तिनें आरंभीं व्यक्त केलेल्या नाराजीचें भान कुणालाहि उरलें नाहीं.

पण, तिचे सुरवातीचे पदक्षेप होतात न होतात, तोंच दिवाणखान्याच्या दारावरील किनखापाचा पडदा दिवाणजींनीं अदबीनें दूर सारला—

—आणि, हातांत विड्यांनीं भरलेला चांदीचा नक्षीदार डबा घेतलेल्या आपल्या देखण्या परिचारकासह, रायबहादुर आंत आले.

त्याबरोबर सर्वांनीं उभें राहून त्यांना खडी ताजीम दिली; व सरदारसाहेबांनीं मोठ्या गडबडीनें पुढें होऊन त्यांना उजव्या बाजूच्या रांगेंत मध्यभागीं ठेवलेल्या प्रशस्त लोडाजवळ आणून बसविलें.

महबूबखानाच्या लक्षांत आलें, तो इतका वेळ रिकामा असलेला लोड रायबहादुरांची वाट पहात होता; व सारंगीच्या तारांवर तरलतेनें फिरत असलेला त्याच्या हातांतला गज क्षणमात्र थांबला.

त्या क्षणीं चाललेल्या आईये आणि बैठीये यांच्या गडबडींत त्यानें मेहताबला दिलेली ती सूचना कोणाच्याहि लक्षांत आली नाहीं.

पण तिनें मात्र नृत्य करितां करितांनाच किंचित् लवून रायबहादुरांना कुर्निसात केला.

त्याबरोबर तिला कळून चुकलें कीं, त्यांचे तारवटलेले डोळे आपल्याकडे साभिलाष पहात आहेत.

त्यांच्या त्या डोळ्यांना शोभतील अशाच त्यांच्या भुंवया जाडजूड होत्या;

व मिशाहि झुबकेदार असल्यामुळें त्यांचा रुंद चेहरा उग्र दिसत होता. पायांत कलाबतूचे चढाव वरती सुरवार, अंगांत शेरवानी आणि डोक्याला लाल मौक्यांची मखमली टोपी असा त्यांचा पेहराव होता. त्यांच्याबरोबर असलेल्या मुसलमान तरुणाच्या पोषाखाचीहि पद्धत तीच होती. फक्त त्याच्या डोक्यावर जरीची जांभळी उभट टोपी कलती ठेवलेली होती. टोपीच्या दोहों बाजूंनीं दिसणारे रायबहादुरांचे केंस इतके काळे कुळकुळीत होते कीं, जिवणीभोंवतीं पडलेल्या दाट सुरकुत्या लक्षांत न घेणाराला ते ऐन तारुण्यांत असावेत, असाच भास झाला असता. पण, लोडाला टेकून बसल्यावर, परिचारकानें दिलेला विडा तोंडांत टाकून, त्यांनीं टोपी काढतांच त्यांच्या डोक्याला पडलेलें टक्कल विद्युद्दीपाच्या प्रकाशांत इतकें कांहीं तळपूं लागलें कीं, मद्यपानामुळें त्यांच्या गालांवर आलेली गुलाबी तकाकी त्यापुढें पार लोपून गेली.

पण रायबहादुरांच्या मनाचें तारुण्य मात्र यत्किंचितहि कमी झालेलें नव्हतें.

मेहताबचें नृत्यगायन संपल्यावर मंडळी जेव्हां पलिकडल्या दालनांत ठेवलेल्या निरनिराळ्या पेयांचा आस्वाद घ्यावयाला उठली, तेव्हां रायबहादुर तिच्याजवळ जाऊन हंसत हंसत आपल्या घोगऱ्या आवाजांत म्हणाले—

गर अहद बमै शवद कसी फर्दारा<br>
हाली खूश कुन् तूं ई दिले सौदारा<br>
मै नूश बनूर माह ऐ माह के माह<br>
बिस्यार बियायद ओ नियाबद मारा ✻

त्यांच्या तोंडून निघालेली ती उमर खय्यामची समयोचित रुबाई ऐकून इतका वेळ गप्प असलेले खानबहादुर अगदीं बेहोष झाले; व मध्यप्रांत सरकारच्या मंदिरामंत्र्यासमोर आपण किती मर्यादेनें वागलें पाहिजे, याचें भान न

✻ " उद्यांचा भरवसा कोणी सांगावा ? म्हणून आज आतांच या कष्टी मनाला तूं संतुष्ट कर. हे चंद्रिके, चांदण्यांत मद्य प्राशन कर. कारण चंद्र यापुढें अनंत काळ उगवत राहील. पण आपण मात्र त्याच्या दृष्टीस पडणार नाहीं," असा या रुबाईचा आशय आहे. ' मेहताब ' या शब्दाचा अर्थ चंद्र असा होतो.

राहून ते एकदम उद्गारले, " वाहवा, वाहवा रायबहादुर ! आपण बहार उडविली ! मेहताब म्हणजे खरोखरीच मूर्तिमंत चंद्र आहे ! आणि त्या चंद्राच्या सान्निध्यांत मद्याचा आस्वाद घेण्यासारखं दुसरं भाग्य कोणतं असूं शकेल ? "

पण रसिकतेच्या ऊर्मीतहि आपला दर्जा न विसरणाऱ्या रायबहादुरांना त्यांचें तें अमर्याद बोलणें आवडलें नाहीं; व ते खानबहादुरांना अर्धवट विनोदानें म्हणाले, " पण तुमचं हें सुख आम्हांला नडतं याची वाट काय ? गरीब लोक दारू पिणार दिवसभर केलेल्या काबाडकष्टांचा विसर पडावा म्हणून न् तुम्ही श्रीमंत लोक दारू पिणार शिळया होत चाललेल्या सुखांना लज्जत यावी म्हणून ! मिळून दोघांनाहि दारूची आवश्यकता सारखीच. पण कौन्सिलांत मात्र आमच्या कानीं कपाळीं सारखी दारुबंदीची कटकट ! कायद्याची अंमलबजावणी करणाऱ्या न् दारुड्यांना शिक्षा ठोठावणाऱ्या तुम्हां बडया अधिकाऱ्यांचं जर दारूशिवाय एक दिवससुद्धां चालत नाहीं, तर दारुबंदी अंमलांत तरी येणार कशी ? आणि म्हणे सारे जिल्हे कोरडे करा !—"

रायबहादुरांचा तो विनोद खानबहादुरांच्या अगदीं मर्मी झोंबला.

आणि, मेहताबला वाटलें कीं, मघांशीं त्यांनीं आपल्याशीं केलेल्या फाजीलपणाचा पुरेपूर वचपा निघाला.

( २ )

त्या रात्रीनंतर दोन दिवसांनीं तेलंखेडीच्या रस्त्यावरील रायबहादुरांच्या प्रशस्त बागबंगल्यांत मेहताब रहावयाला आली.

रा. ब. ना. नर्मदाप्रसाद श्रीवास्तव हे छात्तिसगड विभागांतील एक प्रमुख रईस असून, त्या वेळीं मध्यप्रांत सरकारचे लोकनियुक्त मंत्री होते. वैभव आणि विलासप्रियता या दोहोंबद्दल त्यांच्या घराण्याची सर्व हिंदुस्थानांत ख्याति होती. असें सांगतात कीं, रायबहादुरांच्या विवाहाच्या वेळीं त्यांचे वडील राजाबहादुर द्वारकाप्रसाद यांनीं पाहुण्यांच्या मनोरंजनासाठीं लग्नमंडपांत शंभर नर्तकींचा ताफा अहोरात्र नाचता ठेवला होता; व विवाहानंतर वर ज्या वेळीं गुलाबाच्या फुलांच्या पायघडयांवरून वधूच्या महालांत जावयाला निघाला, तेव्हां लग्नमंडपापासून विला-

समंदिरापर्यंत विद्युद्दीपकांनी सुशोभित केलेल्या पदपथांच्या दोहीं बाजूंना शेंकडों सुस्वरूप कोसल—कन्यका * नवरदेवावर सोन्याचीं फुलें उधळण्यासाठीं उभ्या करण्यांत आल्या होत्या.

तारुण्याच्या या विलासी प्रस्तावनेला शोभेल असाच रायबहादुरांच्या आयुष्याचा पुढील ग्रंथ होता.

कविता आणि वनिता यांचा रायबहादुरांना विलक्षण शोक होता; व राजकारणांत त्यांचें पाऊल जसजसें पुढें पडत गेलें, तसतसा त्यांचा हा शोक वाढतच गेला. जणुं कांहीं वकिली, जमिनदारीची व्यवस्था, गिरण्यांचा कारभार, स्थानिक संस्थांतील पक्षोपपक्ष, कायदेमंडळांच्या निवडणुकीचे सामने यांच्या रगाड्यांत शिणणाऱ्या आपल्या बुद्धीला विश्रांति आणि विरंगुळा लाभावा, म्हणून ते कविता आणि वनिता यांचा उपभोग घेत असत. उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक प्रमुख हिंदी आणि ऊर्दू कवींना रायबहादुरांकडून वर्षासनें होतीं; व खुद्द त्यांची स्वतःचीहि अभिजात ऊर्दू कवींत गणना होत असे. ते नेहमीं म्हणत कीं, आपल्या लेखणीच्या अग्रावर जर ऊर्दू भाषा कोणी नाचवूं शकत असतील तर ते कायस्थच! त्यांच्या महालांत दर आठवड्याला नव्या नर्तकीचा मुजरा झडत असे. निवडणुकीच्या दौऱ्यावर असतांनासुद्धां त्यांची गाण्याची बैठक कधीं चुकली नाहीं. रायबहादुरांकडून कोणतेंहि काम करून घ्यावयाचें झाल्यास, त्यांची मर्जी प्रसन्न करावयाला नृत्यगायनासारखा दुसरा हुकमी उपाय नव्हता. आणि, सरदार प्रतापरावांना कोर्ट ऑफ वॉर्ड्सच्या ताब्यांतून आपली इस्टेट सोडवून घेण्यासाठीं त्यांची मदत हवी असल्यामुळेंच, त्यांनीं मुद्दाम लाहोरहून मेहताबला आणवून आज आपल्या वाड्यांत तिचा कार्यक्रम केला होता.

पण, रायबहादुरांच्या सान्निध्यांत अहोरात्र राहूनहि, त्यांच्या विलासी जीवनाच्या या वैचित्र्यपूर्ण ग्रंथाचें एकहि पान न पाहिलेली एक व्यक्ति होती.

ती व्यक्ति म्हणजे त्यांची धर्मपत्नी राणी रूपमती देवी.

---

* छत्तिसगड विभागाला राष्ट्रीय सभेनें 'महाकोसल' असें नांव दिलें आहे. तेथील तरुणी त्या कोसलकन्यका,—कौसल्या.

राणीसाहेब अत्यंत सुंदर आणि संगीतकुशल होत्या; व रायबहादुरांचें मन एरवीं कितीहि मोकाट सुटलेलें असलें, तरी रूपमतीच्या तोंडचें तंबोऱ्यावरील एक तरी भजन ऐकल्याशिवाय रात्रीं अन्नग्रहण करावयाचें नाहीं, असा त्यांचा नियम होता. आपल्या पतीच्या जीवनक्रमाची राणीसाहेबांना पूर्ण कल्पना होती. पण, रायबहादुरांच्या मनावर त्यांची अशी कांहीं हुकमत होती कीं, समारंभाशिवाय अन्य कोणत्याहि वेळीं आपल्या वाड्यांत कधीं गाण्याचा साधा जलसासुद्धां करण्याचें धैर्य नामदारसाहेबांना झालें नव्हतें.

रायपुरास काय किंवा नागपुरास काय, त्यांनीं शहराबाहेर मुद्दाम स्वतःसाठीं विलासमंदिरें बांधलीं होतीं; व तिथें त्यांचे केवळ ख्यालीखुशालीचेच नव्हे, तर खाने, पार्ट्या वगैरे इतरहि धर्मसंमत नसलेले कार्यक्रम होत असत. त्यांच्या आयुष्याच्या या भागाशीं आपला जणुं कांहींच संबंध नाहीं, अशा भावनेनें राणी रूपमती वागत असे. घरीं युरोपियन बाई ठेवून ती उत्तम इंग्रजी शिकली होती; व मुलांचें शिक्षण तिच्या देखरेखीखालींच होत असे. पण गव्हर्नमेंट हाऊसवर तिनें कधींहि पाऊल ठेवलें नव्हतें.

रायबहादुरांचा तेलंखेडीवरील बागबंगला म्हणजे एक राजवाडाच होता. आणि त्या राजवाड्यांत नेहमीं कोणती ना कोणती तरी नवीन अप्सरा कांहीं काळ चमकून अस्तंगत होत असे.

पण, आज मेहताब तिथें आली, तीसुद्धां अत्यंत नाराजीनें. त्या दिवशीं रात्रीं परत जाण्यापूर्वी रायबहादुरांनीं महबूबखानाला एकीकडे बोलावून त्याच्या हातांत शंभर रुपयांच्या नोटा कोंबल्या; व त्याच्याशीं त्यांचें बराच वेळ बोलणें झालें. त्यानंतर दोन दिवसांनीं रायबहादुरांनीं पाठविलेल्या मोटारींतून मेहताब त्यांच्या बंगल्यावर रहावयाला आली.

तिला राग आला तो या गोष्टीचा कीं, ज्या सरदारसाहेबांच्या आग्रहाच्या आमंत्रणावरून ती नागपूरला आली होती, त्यांचा निरोप घेण्याचीसुद्धां संधि महबूबनें तिला मिळूं दिली नाहीं. वास्तविक तो दरबारी रिवाजांत मुरलेला सारंगिया होता. पण, ज्यांच्या बोलावण्यावरून आपण इथें आलों, त्यांची नुसती

औपचारिक परवानगी घेण्याची सुद्धां पर्वा त्यानें या वेळीं केली नाहीं. तिला राहून राहून सारखें वाटे, सरदारसाहेब रात्रीं ज्या वेळीं नेहमींप्रमाणें आपल्याला भेटावयाला येतील, त्या वेळीं आपण तिथून अकस्मात् निघून गेल्याचें पाहून त्यांच्या मनाला काय वाटेल ?

या मनःस्थितींत ती असतांनाच संध्याकाळ झाली; व रायबहादुर रात्रीं मैफल ऐकावयाला येणार असल्याचें तिला महबूबनें सांगितलें.

त्याबरोबर ती चवताळून त्याला म्हणाली, " आबाजान, मी कांहीं आतां लहान पोर नाहीं तुम्ही मला दरवेशाप्रमाणें वाटेल त्याच्यासमोर नाचायला सांगायला—"

तेव्हां महबूब आपली लाल रंग दिलेली दाढी कुरवाळीत अगदीं शांतपणानें म्हणाला, " बेटा, मी तुला आजपर्यंत कधीं तरी वाटेल त्याच्यापुढें नाचायला सांगितलं आहे का ? तूं आतां मोठी झाली आहेस हें मला समजतं. तुझी मर्जी नसेल, तर तूं नको बैठकीला बसूं आज;—जातील बिचार रायबहादुर आल्या पावलीं परत !—"

" बैठकीला बसायला ना नाहीं माझी. – माझा जन्मच मुळीं त्यासाठीं आहे ! पण तुम्हीं मला आधीं कांहीं न सांगतां परस्पर इथं रहायला कां आणलंत ? सरदारसाहेबांना काय वाटलं असेल आपलं हें वर्तन पाहून ?—"

' रायबहादुरांनीं त्यांची समजूत घालण्याची हमी घेतली आहे बेटा ! "

"काय बोलतां आबाजान आज तुम्ही हें ? रायबहादुर कोण त्यांची समजूत घालणार ? आपल्याला त्यांनीं इथं बोलावलं, रायबहादुरांनीं नव्हे ! तुम्हांला नुसता पैसा दिसतो; अंतःकरणाची कांहीं चाड नाहीं तुम्हाला. खरोखर, मी कंटाळलें या जिण्याला आतां ! आज कांहीं मी बसायची नाहीं गाण्याला तुम्ही कांहीं बोललांत तरी—"

पण अखेर रायबहादुर आल्यावर मेहताब मुकाट्यानें गाण्याला बसली.

आणि त्यानंतर तिचें नृत्यहि झालें.

नृत्य संपल्यावर रायबहादुरांनीं तिचा हात धरून तिला आपल्या शेजारीं

लोडाजवळ आणून बसविलें; व हुजऱ्याला मद्याचे पेले भरून आणण्याचा हुकूम फर्मावला.

त्याबरोबर मेहताब अदबीनें म्हणाली, " माफ करा जनाब ! मी मद्याला आजपर्यंत कधीं स्पर्श केलेला नाहीं.—आमच्या धर्मांत मद्य मना आहे —"

" धर्मांत पुष्कळ गोष्टी मना केलेल्या आहेत मेहताब ! पण आपण त्या करतोंच कीं नाहीं ? मद्याशिवाय मैफलीला मजा नाहीं. उमरनें काय म्हटलंय माहित नाहीं तुला ?—"

बोलतां बोलतां मद्य आणि संगीत यांचा महिमा वर्णन करणारी एक रुबाई त्यांनीं आपल्या घोगऱ्या आवाजांत म्हणावयाला सुरवात केली—

—आणि ती म्हणत असतांनाच त्यांनीं मेहताबच्या गळ्यांत हात घालून तिला जवळ घेण्याचा प्रयत्न केला.

पण त्यांचा हात बाजूला सारून मेहताब एकदम उभी राहिली व म्हणाली, " आपली माझ्याविषयीं कांहीं तरी गैरसमजूत झालेली दिसते, हुजूर ! आजपर्यंत मी कोणालाही माझ्याशीं असं वर्तन करूं दिलेलं नाहीं !—"

आणि हे शब्द उच्चारून ती तडक आंत निघून गेली.

रायबहादुर इष्काचे दर्दी खरे. पण त्यांना, आपण आज फार घाई केली, असें वाटलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मेहताब नास्ता करीत बसली असतां दासीनें तिच्यापुढें तलम तरपोसानें झांकलेलें चांदीचें तबक आणून ठेवलें.

महबूबनें तो तरपोस उचलला—

त्या तबकांत मोत्यांचा बहुमोल कंठा होता.

महबूब तो कंठा आपल्या हातांत घेऊन त्याच्याकडे कौतुकानें पहात असतां मेहताब रागानें म्हणाली " आबाजान, मी आज परत शहरांत जायचा निश्चय केला आहे अगदीं—

" ठीक आहे. माझी मुळींच हरकत नाहीं बेटा ! " महबूबनें कंठा तबकांत ठेवून दाढीवरून हात फिरवीत म्हटलें.

मेहताब आतिशय चिडली. पण तिला पुढें काय बोलावें हें समजेना.

थोडा वेळ गेल्यावर ती अगदीं दीनपणानें म्हणाली, "आबाजान, तुमच्या मनांत काय आहे?"

"तुझ्या कल्याणाशिवाय दुसरं कांहीं नाहीं बेटा!" महबूबनें दाढी कुरवाळीत उत्तर दिलें.

पुन्हा थोडा वेळ थांबून अखेर त्याच्याकडे निश्चल नजरेनें पहात मेहताब एक प्रकारच्या निर्धारानें म्हणाली, "आबाजान, तुम्हांला माहित आहे सगळं! —रायबहादुरांच्या मनांत असलेली गोष्ट माझ्या हातून कधींहि घडण शक्य नाहीं—"

ती तेवढेंच बोलून थांबली.

तिचें ते शब्द ऐकतांच महबूबचा चेहरा काळा ठिक्कर पडला, त्यानें मान खालीं घातली.

पुन्हा थोड्या वेळानें ती त्याला म्हणाली, "तुम्हांला दुखवावं म्हणून मी बोलत नाहीं हें!—पण तुम्हांला साऱ्या गोष्टी माहित असतांना तुम्ही व्यर्थ पैशाच्या लोभानं आणलं मला इथं आबाजान! इथून परत जाण्यांतच कल्याण आहे आपलं—"

"ठीक आहे. जशी तुझी मर्जी! रायबहादुरांनीं मला आतां बोलावलं आहे. त्यांना भेटून मी नक्की करतों जाण्याचं—"

आणि, नास्ता आटोपल्यावर महबूबखान जो बाहेर गेला, तो संध्याकाळ झाली तरी परत आला नाहीं.

पण मेहताबच्या मनाचा अगदीं निश्चय झाला होता कीं, कांहीं झालें तरी आजची रात्र कांहीं या बंगल्यांत काढावयाची नाहीं. रायबहादुरांच्या सलगीचा तो कालचा प्रसंग आठवला, म्हणजे तिच्या अंगावर अगदीं शहारे येत. महबूब परत आल्यावर आपण शहरांत जावयाचें, अशा निर्धारानें ती तयार होऊन बसली होती.

पण सूर्य मावळला, तरीहि महबूबचा पत्ता नाहीं.

तिला कोणाला कांहीं विचारतांहि येईना. कारण एक तर गोषा; व पुन्हा सारे नोकर अनोळखी. मोटारीचा आवाज कानांवर पडला कीं, महबूब आला असावा असें वाटून तिचें मन उत्कंठित होत असे. पण काळोख पडत चालला, तरीहि महबूब आला नाहीं.

शेवटीं तिनें मोटारीच्या आवाजाकडे लक्ष देण्याचें सोडून दिलें. तिला वाटलें, आजची रात्र आपल्याला इथेंच काढावी लागणार,—पुन्हा रायबहादुरांचा स्पर्श सहन करण्याचा प्रसंग आपल्यावर ओढवणार! या संकटांतून आपल्याला कोणीच का सोडवणार नाहीं ?

तिच्या मनांत हा विचार यावयाला आणि दारावरला पडदा दूर व्हावयाला एकच गांठ पडली.

तिनें भीतीनें आणि उत्सुकतेनें दाराकडे पाहिलें—

— हुजऱ्याच्या मागोमाग सरदार प्रतापराव आंत आले.

" माफ करा हं कळवल्याशिवाय आंत आल्याबद्दल ! "

" आम्हीच खरोखरी माफी मागितली पाहिजे आपली सरदारसाहेब ! मला कांहीं कल्पना नव्हती.—काल अकस्मात् मोटार आली रायबहादुरांची दुपारीं न् मी तेव्हांपासून इथंच आहे—"

" माझ्या लक्षांत ताबडतोब आली ही गोष्ट !—मग किती दिवस इथं मुक्काम आहे तुमचा आणखी ? "

" मी या क्षणाला आपल्याबरोबर यायला तयार आहे सरदारसाहेब !—आबाजानला मी सकाळींच सांगितलं आज कांहीं झालं तरी आपल्याला इथं रहायचं नाहीं म्हणून—"

" पण मला नेतां येणार नाहीं तुम्हांला आपल्याबरोबर ! रायबहादुरांच्या परवानगीशिवाय तुम्हांला इथून घेऊन जाणं अशक्य आहे—"

" या अल्ला ! मग कसं करूं मी आतां ? "

आणि हे शब्द उच्चारून तिनें अशरणतेनें तकियावर मस्तक टेकलें.

त्याबरोबर प्रतापराव तिच्या जवळ गेले; व ओढणी बाजूला सरल्यामुळें उघड्या पडलेल्या तिच्या सुंदर केशकलापावर त्यांनीं हात ठेवला.

पण, ते जवळ येतांच, त्यांच्या हाताचा स्पर्श तिच्या शरीराला होतांच, लाजाळूच्या पानांचा जसा संकोच व्हावा, तशीं मेहताबचीं गात्रें एक प्रकारच्या उपरतीनें चरमलीं—तिच्या अंगावर भीतीनें शहारे आले. तिची ती अवस्था प्रतापरावांच्या लक्षांत आली; व तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन त्यांनीं तिला अत्यंत प्रेमानें विचारलें, "मेहताब, प्यारी काय हें ? आतांच तूं माझ्या-बरोबर येण्याची गोष्ट बोलत होतीस न् मी नुसता जवळ येतांच तुला भीतीनें कांपरें भरलें—"

मेहताबनें त्यांच्या हातांतून आपले हात सोडवून घेतले व त्यांच्यापासून थोडी दूर होऊन ती म्हणाली, "तुम्हांला कल्पना नाहीं सरदारसाहेब माझ्या आयुष्याची !—माझ्यासारखी अभागी स्त्री दुनियेंत दुसरी कोणी नसेल—"

आणि तिच्या डोळ्यांतून घळघळां अश्रु वाहूं लागले.

प्रतापरावांनीं पुन्हा तिला जवळ घेण्याचा प्रयत्न केला. पण आपला स्पर्श तिला सुखकर होत नाहीं, सहन होत नाहीं, हें लगेच त्यांच्या लक्षांत आलें.

तेव्हां ते गोंधळून जाऊन तिला म्हणाले, "मेहताब, तूं असं का बोलतेस कळत नाहीं मला. मी तुला आतां माझ्याबरोबर घरीं न्यायला तयार आहे. तुझे आबाजान तुझ्याबरोबर असतांना—"

"माझे आबाजान ! कोणाला म्हणतां तुम्ही माझे आबाजान ?" मेहताब रडतां रडतां एकदम मोठ्यानें हंसली.

तिचें तें हंसणें इतकें भकास, इतकें भेसूर होतें कीं, तिला भ्रमाचा तर झटका आला नाहीं ना, अशी भीति प्रतापरावांना वाटली; व पुन्हा तिच्यापाशीं जाऊन त्यांनीं हळूच तिला जवळ घेतलें. आणि तिच्या केंसांवरून हात फिरवीत ते तिला म्हणाले, "मेहताब, तूं खरं खरं सांग मला तुला काय होतंय, काय वाटतंय तें ! गेल्या वर्षी मी तुला श्रीनगरला पाहिली, तेव्हांपासून माझं मन ओढ घेतंय तुझ्याकडे. पण तुझ्यासारख्या रत्नाला आश्रय देण्याचं सामर्थ्य आज मला नाहीं. तुझ्याकडे बघून मला केव्हांहि असं वाटलं नाहीं कीं, तूं इतकी दुःखीकष्टी असशील !—खरं सांग, हा महबूब तुझा कोण आहे ? तुझ्या मनावर

इतका कोणत्या दुःखाचा भार आहे? मला वाटलं महबूब हा तुझा पिता असावा—"

" महबूब माझा पिता?–होय माझीहि तशीच समजूत होती एका वेळीं. आणि, आतां जरी ती समूळ नष्ट झाली असली, तरी मी आबाजान अजूनहि म्हणते त्याला संवय पडल्यामुळं! पण सरदारसाहेब, महबूब माझा पिता नाहीं. तो जर माझा पिता असता, माझ्यावर जर त्याचं खरोखरच पोटच्या पोरीप्रमाणें प्रेम असतं, तर माझं जीवितपुष्प उमलण्यापूर्वीच खुडून त्याचा चोळामोळा केला नसता त्यानं! आमचं काश्मीर हें नंदनवन असलं, तरी तें उन्हाळ्यांत सुखविलासासाठीं तिथं येणाऱ्या तुमच्यासारख्या लक्ष्मीपुत्रांना. खुद्द काश्मीरां-तल्या गोरगरीबांना जर तुम्ही विचाराल, तर ते मूर्तिमंत नरकलोक तिथं नांदतो आहे असं सांगतील तुम्हांला! शरीर विकून स्वतःचं पोट भरणाऱ्या वेश्या न् मुली विकून स्वतःच्या तुंबड्या भरणारे व्यापारी यांचं आगर आहे काश्मीर हं. गुलाबांच्या फुलांइतक्याच उघडपणानं तरुण मुली विकल्या जातात तिथं न् गुलाबाच्या फुलांसारखंच सौंदर्य क्षणिक ठरतं त्यांचं! माझा जन्म केव्हां कुठं झाला माहित नाहीं मला. मी फक्त एवढंच ऐकलंय एकदां महबूबच्या तोंडून कीं, मी अगदीं लहान अर्भक असतांनाच त्यानं एका व्यापाऱ्याकडून मला विकत घेतली. त्या वेळीं तरी माझ्यावर त्याचं पोटच्या गोळ्याप्रमाणं प्रेम होतं; व त्यानं अतिशय परिश्रम घेऊन मला नृत्यगायनाची कला शिकविली. तो माझा जन्म-दाता पिता आहे, अशीच समजूत होती माझीहि त्या वेळीं. पण एक दिवशीं संध्याकाळीं त्यानं मला कुसुंबा पाजला; व दुसऱ्या दिवशीं सकाळीं मला होष आल्यावर माझ्या लक्षांत आलं कीं, आपलं कौमार्य नष्ट झालं आहे!—"

" काय सांगतेस तूं हें मेहताब?"

" मी खरं खरं सांगतें आहे अगदीं सरदारसाहेब. माझ्या वयाला पुरतीं चवदा वर्षेंहि झालीं नव्हतीं तेव्हां. शेळीला आपल्या हातानं चारा घालून वाढवून शेवटीं एक दिवस तिच्या गळ्यावर सुरा फिरविणाऱ्या कसायासारखं कृत्य होतं त्याचं तें!—त्याचा तो अधमपणा लक्षांत आल्यावर त्या संतापाच्या भरांत मी

त्याला नाहीं नाहीं तें टाकून बोललें, मारायला धांवलें, स्वतःचा जीव द्यायला निघालें.—तेव्हां तो गयावया करून माझ्या पाया पडला; केवळ तुझ्या सौंदर्याला बळी पडून मी हें कृत्य केलं असं त्यानं मला सांगितलं; व पुन्हा अशी गोष्ट करणार नाहीं, अशी कुराणशरीफाची कसम त्यानं घेतली. त्या शपथेप्रमाणें गेलीं दहा वर्षे तो वागतो आहे. पण त्या दिवसापासून माझा त्याच्यावरचा विश्वास उडाला, सर्व पुरुषजातीवरचा विश्वास उडाला. माझ्या जीवनाच्या झऱ्यांत जणुं उगमापाशींच विष कालवल्यासारखं झालं. आणि, पुरुषाच्या स्पर्शाविषयीं मला अशी कांहीं शिसारी उत्पन्न झाली कीं, प्रणयाच्या स्त्रीसुलभ वासनांना मी पारखी होऊन बसलें. म्हणून म्हणतें कीं, माझ्यासारखी दुर्दैवी स्त्री तुम्हांला दुसरी कोणी सांपडणार नाहीं —"

बोलतां बोलतां आपल्या भोंवतीं लपेटलेले त्यांचे हात दूर सारण्याचा तिनें प्रयत्न केला.

पण त्यांनीं तिच्या तोंडावरून हात फिरवीत तिला म्हटलें, " वेडी आहेस तूं मेहताब ! महबूबनं क्षणिक वासनेला बळी पडून जें कृत्य केलं, त्यामुळं सगळ्या पुरुषजातीवरचा विश्वास कसा उडाला तुझा ? त्यानं पुन्हा तसा अविचार केला नाहीं, यावरूनच तुला कळायला हवं होतं कीं, एक प्रकारच्या नशेंत, वेडाच्या झटक्यांत त्याच्या हातून तो अत्याचार घडला. आणि तूं काढून टाकायला हवी होतीस त्याची आठवण मनांतून—"

" नाहीं सरदारसाहेब. अशक्य आहे त्या प्रकाराची आठवण बुजणं. कांहीं जखमा कशा असतात कीं, त्या कधींच बुजत नाहींत, कधींच वहायच्या थांबत नाहींत; न् सारं जीवन दूषित होऊन जातं त्यांच्या विषारानं. तसं झालं आहे माझं. तुम्हांला मी श्रीनगरला गेल्या वर्षी पाहिलें, तेव्हां मला अत्यंत प्रेम उत्पन्न झालं तुमच्याविषयीं—"

पण तिचें तें वाक्य पुरें होण्यापूर्वींच दारावरील पडदा झटकन् दूर झाला-

—आणि रायबहादुरांनीं आंत पाऊल टाकलें.

महबूब त्यांच्या मागें उभा होता.

त्यांना बघितल्याबरोबर सरदारसाहेब एकदम उठून उभे राहिले व त्यांनीं

रायबहादुरांना लवून कुर्निसात केला.

मेहताब तें दृश्य पहात मुकाट्यानें उभी होती.

रायबहादुर कांहीं बोलले नाहींत. त्यांनीं हातानेंच त्या दोघांना बाहेर जाण्याची खूण केली व नंतर ते मेहताबला म्हणाले, " मेहताब, काल तूं काय म्हणाली होतीस मला ? आणि तुझ्या या वर्तनाचा अर्थ मी काय समजायचा आतां ? "

" अर्थ अगदीं उघड आहे, हुजूर ! आपण मला माझ्या आबाजान-सारखे आहांत. आपले केंस कितीहि काळे कुळकुळीत असले, तरी आपलें टक्कल बघितल्यावर कोणत्याहि तरुण स्त्रीला आपल्या प्रणयचेष्टा दुःसह वाटतील !— मी नर्तकी असलें, तरी मलाहि भावना आहेत, अभिरुचि आहे—"

मेहताबचे पुढचे शब्द ऐकावयाला रायबहादुर तिथें राहिले नाहींत.

( ४ )

खिडकीच्या कठ्ठ्यावर बसून मेहताब मघांशीं घडलेल्या प्रकाराचा विचार करीत होती. खोलींतील दिवा तिनें विझवून टाकला होता. पण नुकत्याच उगवलेल्या चंद्राचे किरण तिच्या अंगावर पडले होते. आणि वाऱ्याच्या मंद झुळकेबरोबर बागेंतील संत्र्यांच्या फुलांचा परिमळ खोलींत पसरला होता. त्या प्रकाशमिश्र अंधारांत खिडकीच्या कठड्यावर मस्तक टेंकून ती जणुं कांहीं आपल्या खंडित जीविताचा चित्रपट पहात होती.

आपल्या आयुष्यांतील तें अघोर रहस्य तिनें आज प्रथमच दुसऱ्याला सांगितलें होतें. आणि या आपल्या वर्तनाचा तिला राहून राहून अचंबा वाटत होता. आपला व त्या तरुण सरदाराचा असा काय मोठा जिव्हाळा लागून गेला आहे कीं, आपल्या जीवितांतील तें इतर कोणालाहि ठाऊक नसलेलें विदारक रहस्य आपण त्याला सांगावें ? प्रतापरावांना प्रथम तिनें श्रीनगरला पाहिलें, तो प्रसंग तिला आठवला. एका खासगी बैठकींत तिचें त्या दिवशीं रात्रीं गाणें झालें. त्या गाण्याला उन्हाळ्यानिमित्त काश्मीरला आलेली बरीच बडी मंडळी हजर होती. गाणें संपल्यानंतर इतर कांहीं शोकीन पाहुण्यांप्रमाणें प्रतापरावांनीं तिला

बिदागी दिली नाहीं. फक्त तिच्याजवळ जाऊन मोठ्या विनयानें तिच्या संगीत-नैपुण्याची तारीफ केली. आणि, कां कोण जाणे, पुरुषांविषयीं विटलेल्या तिच्या मनाला त्यांचे ते उमदे, अव्याज आनंदानें फुललेले टपोरे डोळे पहातांच त्यांच्याविषयीं एक प्रकारचें विलक्षण आकर्षण, अगदीं अननुभूत अशी आत्मीयता वाटली !

त्यांच्याविषयींच्या या आकर्षणामुळेंच, आबाजान त्यांचें आमंत्रण स्वीकारण्याच्या अगदीं विरुद्ध असतांनासुद्धां, त्यांच्या नाराजीची पर्वा न करितां आपण हट्टानें नागपूरला आलों.

आणि त्या आकर्षणाला बळी पडूनच आपण आपल्या आयुष्यांतील हें किळसवाणें गुपितहि आज त्यांना सांगितलें.

पण त्या गौप्याची अशा रीतीनें वाच्यता करण्यांत आपण आबाजानला एका परीनें अन्याय केला नाहीं का ? त्या दिवशीं तो अमानुष प्रकार घडल्यापासून तिला जरी त्याची अतोनात चिळस आली होती, तरी त्यानें ती शपथ घेतल्यानंतर एका शब्दानेंहि तिनें कधीं त्याला त्या गोष्टीची जाणीव दिली नाहीं. आणि त्यानेंहि गेल्या दहा वर्षांत अनेक लक्ष्मीपुत्रांच्या आणि राजेरजवाड्यांच्या आक्रमक अभिलाषापासून तिचें संरक्षण मोठ्या चातुर्यानें केलें होतें. मग त्याच्या विषयींचें हें अघोर गुपित एका तिऱ्हाइताला सांगून आपण त्याला अन्याय केला नाहीं का ?—छे छे, आबाजानला सारी हकीकत खुल्या दिलानें सांगून आपण त्याची माफी मागितली पाहिजे.

हा विचार तिच्या मनांत येतो न येतो, तोंच तिच्या कानांवर चाहूल आली.

तिनें दचकून मागें वळून पाहिलें—

—गुप्त धनावर बसलेल्या नागाच्या डोळ्यांसारखे आबाजानचे पिंवळसर डोळे त्या अंधारांत चमकत होते.

तिच्या अंगावर एकदम शहारे आले; घशाला कोरड पडली व खिडकीच्या कट्ट्यावरून खालीं उतरून ती उद्गारली, “ आबाजान, तुम्ही केव्हां आलांत ? ”

" आतांच आलें बेटा ! तुला जेवायचं नाहीं का आज ?—"

त्याच्या त्या ममताळू शब्दांनीं तिच्या मनांत उत्पन्न झालेली पहिली भीतीची भावना एकदम कमी झाली; व ती त्याच्याजवळ जाऊन म्हणाली, "आबाजान, तुम्ही रागावलांत नाहीं ना मघांचच्या प्रकाराबद्दल माझ्यावर ?–"

"नाहीं बेटा. पण तूं रायबहादुरांना दुखवायला नको होतंस अशा रीतीनं ! —आतां आपल्याला इथून बाहेर निघणं किती कठीण झालं आहे याची कल्पना नाहीं तुला—"

" पण सरदारसाहेबांनीं मला वचन दिलंय इथून सोडवून नेण्याचं—"

तिचे ते उद्गार ऐकून महबूबखान हंसला. त्याच्या डोळ्यांत ती विलक्षण चमक पुन्हा क्षणार्ध खेळून गेली.

" चल बेटा, जेवायला चल आधीं.—मग बोलूं सावकाश," तो म्हणाला.

जेवतांना त्यानें तिला फार आग्रह केला. तो संगीताप्रमाणें पाकशास्त्रांतहि अतिशय कुशल होता; व आज तिच्यासाठीं तिला आवडणारे पदार्थ त्यानें स्वतः तयार केले होते. आणि, सासरीं जावयाला निघालेल्या मुलीला आई जशी आग्रह करकरून तिचे आवडते पदार्थ वाढते, तसा तो तिला जेवतांना परोपरीनें आग्रह करीत होता.

जेवण झाल्यावर त्यानें सारंगी काढली; व तिला म्हटलें,

"बेटा, आज तूं माझ्या आवडत्या चिजा म्हणून दाखव मला सगळ्या !—"

" आबाजान, मघांशीं तुम्ही मला इतके स्वादिष्ट पदार्थ खायला घातले आहेत आग्रहानं कीं, आतां मला एकसुद्धां गाणं म्हणणं शक्य नाहीं भरल्या पोटीं ! " मेहताब हंसून म्हणाली.

" नाहीं बेटा, आज माझा शब्द तूं कोणत्याच बाबतींत मोडतां कामा नयेस—"

आणि, त्याच्या आवाजांत इतकी कणव भरलेली होती कीं, मेहताबनें तंबोरा हातांत घेऊन मुकाट्यानें गावयाला प्रारंभ केला.

मध्यरात्र उलटून जाईपर्यंत तिचें गाणें चाललें होतें. पण, तिला गात असतांना राहून राहून सारखें वाटत होतें कीं, आज आबाजान आपलें गाणें ऐकत नसून आपणच उलट त्याची सारंगी ऐकत आहे! ! त्याच्या सारंगींतून हृदयाला पीळ पाडणारे इतके मधुर आणि भेदक सूर आजपर्यंत कधींच बाहेर पडलेले तिनें ऐकले नव्हते. गाणें संपल्यावर तंबोरा खालीं ठेवतांना ती त्याला म्हणाली सुद्धां, " आबाजान, तुमच्या सारंगीनं आज दिल बेचैन करून सोडला माझा--"

पण महबूब कांहीं बोलला नाहीं. त्याच्या चेहऱ्यावर विलक्षण उदासीनता आली होती. परंतु तंबोऱ्याला गवसणी घालण्याच्या गडबडींत असलेल्या मेहताबच्या लक्षांत ती गोष्ट आली नाहीं.

त्यानंतर ती आपल्या खोलींत गेली; व तोंडावर गार पाण्याचा शिडकावा करून तिनें बिछान्यावर अंग टाकलें.

तोंच तिच्या कानांवर चाहूल आली—

तिनें लगेच भीतीनें उठून पाहिलें,—महबूब कांहीं तरी हातांत घेऊन तिच्याकडे येत होता.

त्याच्या डोळ्यांत पुन्हा ती विलक्षण चमक खेळत होती.

मेहताबच्या अंगावर कांटा उभा राहिला, ती घामानें अगदीं डबडबून गेली.

तो तिच्याजवळ येऊन म्हणाला, " बेटा, मी फुलं आणलीं आहेत तुझ्यासाठीं—"

त्याच्या त्या शब्दांत इतकें कांहीं मार्दव भरलें होतें कीं, तिला आपण त्याच्याविषयीं भलतीच भीति मनांत धरल्याबद्दल अतिशय शरम वाटली; व ती त्याला अत्यंत प्रेमानें म्हणाली, " आज काय वेड लागलंय का तुम्हांला आबाजान ? "

" नाहीं बेटा ! —मघाशीं तूं आपल्या इच्छेविरुद्ध गाऊन दाखवलंस मला !—हा बुड्ढा काय देऊं शकतो दुसरं बक्षीस तुला ? "

आणि गुलाब, मोगरा निशिगंध वगैरे तिला अतिशय आवडणारीं फुलें त्यानें तिच्या बिछान्यावर पसरलीं.

मेहताबला काय वाटलें कुणाला ठाऊक! तिनें त्याचे दोन्ही हात एकदम आपल्या हातांत घेतले व ते आपल्या डोळ्यांवर, गालांवर, केसांवर दाबले.

"आतां तुला वेडाची लहर आलेली दिसतेय बेटा!" महबूब हंसून म्हणाला; व आई ज्या प्रेमानें मुलीला कुरवाळते, त्या प्रेमानें त्यानें तिला कुरवाळलें.

आणि नंतर तो तिला म्हणाला, "नीज बेटा! मी जातों आतां—"

त्यानंतर एक तासानें पुन्हा महबूब त्या खोलींत आला. त्यानें मघाशी तयार केलेल्या पुष्पशय्येवर मेहताब निजलेली होती. चंद्राचा प्रकाश तिच्या अंगावर पडला होता. त्या प्रकाशांत तिच्या ओंठाभोंवतीं उमललेलें अत्यंत मधुर स्मित त्याच्या दृष्टीस पडलें.

तो किती तरी वेळ तिच्याकडे टक लावून पहात होता. पहातां पहातां त्याचे डोळे पाण्यानें भरून आले.

तो हळूच तिच्या अगदीं जवळ गेला; व त्यानें सकाळीं रायबहादुरांकडून आलेल्या त्या तरपोसांतून कांहीं तरी बाहेर काढून तें प्रकाशांत वर करून पाहिलें.

त्याबरोबर त्याची धार त्या अंधारांत विजेप्रमाणें लखलखली.

आणि आपल्या अंगांतील सारें बळ एकवटून तो खंजीर त्यानें तिच्या काळजांत खुपसला.

ज्योत्स्ना, ऑगस्ट १९३६

